


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

अंक : २२१
एप्रिल-मे-जून
१९८२



विष्णुशास्त्री
चिपळूणकर
व
महात्मा
फुले

अनुक्रमणिका

महाराष्ट्र राज्य साहित्यसंस्कृती मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

( अंक २२१ : एप्रिल; मे, जून १९८२ )

संपादक : भीमराव कुलकर्णी ▫ संपादन-समिती : रमेश मंत्री, राजेंद्र बनहट्टी आणि महावीर जोंधळे ▫ जाहिरात समिती : राजा फडणीस, केशवराव कोठावळे, दत्ता जी. कुलकर्णी.

प्रकाशक : म. श्री. दीक्षित, कार्यवाह, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०

मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणे ३०

---

## अनुक्रमणिका



■

महाराष्ट्र राज्य साहित्यसंस्कृती मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

( अंक २२१ : एप्रिल; मे, जून १९८२ )

संपादक : भीमराव कुलकर्णी ▫ संपादन-समिती : रमेश मंत्री, राजेंद्र बनहट्टी आणि महावीर जोंधळे ▫ जाहिरात समिती : राजा फडणीस, केशवराव कोठावळे, दत्ता जी. कुलकर्णी.

प्रकाशक : म. श्री. दीक्षित, कार्यवाह, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे ३०

मुद्रक : चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणे ३०

---

## अनुक्रमणिका



■

## संपादकीय

### कविवर्य अनिल

आत्माराम रावजी देशपांडे ऊर्फ 'कवी अनिल' यांच्या दुःखद निधनाने मराठी साहित्य आणि साहित्यसंस्था यांची फार मोठी हानी निश्चितच झाली आहे. अनिलांच्या रूपाने एक जातिवंत कवी आणि रसिक आमच्यामध्ये नांदत होता आणि त्यांच्या सान्निध्याने आमच्या जीवनाला एक फार मोठा आनंद दिला. 'आप्पा' या घरगुती नावाने माझ्यासारख्या शेकडो जीवलग व्यक्तींच्या जीवनात त्यांनी जिव्हाळ्याचे स्थान निर्माण केले होते. कविता हे एक दैवी प्रस्फुरण असून तिच्या आराधनेत सदैव धुंद असलेला आणि तिच्यावर इतकी अव्यभिचारी निष्ठा असलेला दुसरा कवी मी पाहिला नाही. बहुसंख्य साहित्यिकांप्रमाणे आप्पांची रसिकता एकांगी म्हणजे केवळ वाङ्मयकलेपुरती मर्यादित नव्हती. संगीतशिल्पचित्रादी इतर कलांचे त्यांचे भान व समज फार चांगली होती. व्यवसायानिमित्त कायदा व शिक्षण या क्षेत्रांशी त्यांचे उमेदीचे आयुष्य निगडित असले तरी सेवानिवृत्तीनंतरच्या काळात ते साहित्यसंस्थांच्या राजकारणात हिरीरीने उतरले आणि आपल्या लढाऊ बाण्याने या क्षेत्रात त्यांनी चांगलीच खळबळ उडविली !

आप्पा अस्सल वऱ्हाडी असले तरी पुण्याशी त्यांचा घनिष्ठ संबंध होता. फर्ग्युसन कॉलेजात उच्च शिक्षण घेत असता त्यांना प्रेमाची लागण लागली ती पुण्याला. कॉलेजात प्रा. वासुदेव बळवंत पटवर्धन हे सहज बोलण्याच्या भरात वॉल्ट व्हिटमन या अमेरिकन कवीच्या कविता आणि त्याचा मुक्तछंद यासंबंधी काही बोलून गेले. त्या बोलण्याचा त्यांच्या मनावर सखोल परिणाम होऊन त्यातूनच मुक्तछंदाची त्यांच्या हातून वैशिष्ट्यपूर्ण निर्मिती झाली. त्यांच्या 'भग्नमूर्ती' या काव्यसंग्रहावर १९४० मध्ये परिषदेने पहिला परिसंवाद केला. महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९५८ मध्ये मालवण येथे भरविलेल्या ४० व्या साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते; आणि मराठी साहित्य महामंडळाचे कार्यालय पुण्यास आल्यानंतर त्याचे अध्यक्ष म्हणून आम्ही कविवर्य अनिलांचीच निवड केली.

आप्पांचा ७० वा वाढदिवस साहित्य परिषदेने अतिशय थाटामाटाने साजरा केला. त्यावेळी केवळ चार दिवसांच्या अवधीत त्यांच्या 'चिरयौवन' या निवडक काव्यसंग्रहाचे संपादन करून ते प्रसिद्ध करण्याचे भाग्य मला लाभले. त्यांना गेल्या वर्षी ८० वर्षे पूर्ण झाली म्हणून पुण्याच्या 'सकाळ'मध्ये मी विस्तृत लेख लिहिला आणि त्यांच्या वाढदिवशी पुणे विद्यापीठ, फर्ग्युसन कॉलेज व मॉडर्न कॉलेज येथे त्यांच्या

अनुक्रमणिका

कवितांची मी नुकतीच करून घेतलेली ध्वनिपट्टिका वाजून दाखविली.

गेल्या ऑगस्ट महिन्यामध्ये त्यांची पुण्याला झालेली शेवटची भेट. त्यानंतर ते रायपूरला कविसंमेलनात भेटले. वयपरत्वे थकले होते परंतु वाङ्मयाबद्दलचा उत्साह मुळीच कमी झाला नव्हता.

८ मेला गुहागर येथे साहित्यिकांच्या मेळाव्यात त्यांच्या मृत्यूची वातमी समजली. आमच्या वैयक्तिक जीवनात 'फुलवाती' प्रमाणे प्रकाश देणारा आणि त्यांच्या बरोबर सार्वजनिक जीवनात काम करताना 'झंझावाती' प्रमाणे उसळून उठणारा जीवनाधार मालवला या कल्पनेने विलक्षण दुःख झाले. त्यांच्या अखंड स्मृती आमच्या मनातून कधीच पुसल्या जाणार नाहीत. त्यांना विनम्र श्रद्धांजली !

## मृत्यूचे आघात

प्रा. नरहर कुरुंदकरांच्या अकाली निधनानंतर मृत्यूने अनेक मराठी साहित्यिकांवर आघात केले. प. स. देसाई, शामराव ओक, गो. गं. पारखी, वा. वि. भट, अच्युत बर्वे, अरुण लिमये, का. न. केळकर इत्यादिकांच्या गेल्या दोनएक महिन्यांतील मृत्यू-मुळे साहित्यिकांनी व्यथित व्हावे अशी परिस्थिती निर्माण झाली आहे.

**प. स. देसाई :** हे जुन्या पिढीतील विपुल साहित्यनिर्मिती करणारे साहित्यिक. हरी नारायण, नाथमाधव यांच्या लेखनाने प्रभावित होऊन त्यांनी १९२५ ते ५० या काळात विपुल साहित्यनिर्मिती, (सुमारे ५० कादंबऱ्या) केली. सरस वाङ्मय रत्नमाला चालविली, अनेक कादंबऱ्यांचे अनुवाद केले, 'आई शारदामणीदेवी' हे चरित्र लिहिले. त्यांच्या मृत्यूने जुन्या पिढीचा शेवटचा दुवा निखळला असेच म्हटले पाहिजे.

**का. न. तथा बापूसाहेब केळकर :** हे साहित्य सम्राटांचे ज्येष्ठ चिरंजीव. शमीपूजन, नेपोलियन, १०० वर्षांपूर्वी इ. पुस्तके लिहून त्यांनी वडिलांची वाङ्मयीन परंपरा जोपासली. ज्योतिष आणि चित्रकला या विषयांत त्यांना गती होती.

**शामराव ओक :** यांनी आपल्या विनोदी स्फुट लेखनाने मराठी विनोदाच्या क्षेत्रात स्वतःचा एक वैशिष्ट्यपूर्ण प्रवाह निर्माण केला. 'चोरबाजारातील चिजा,' 'मालगाडी,' 'बाभळवनात,' 'गलोल' 'कोपरखळ्या' आणि 'शामराई' हे त्यांचे विनोदी लेखसंग्रह लक्षणीय आहेत.

**गो. गं. पारखी :** हे कादंबरीकार व नाटककार म्हणून ख्यात होते. त्यांच्या 'सांगत्ये ऐका, या कादंबरीवर निघालेल्या चित्रपटाने लोकप्रियतेचा उच्चांक निर्माण केला. त्यांच्या नाटकांचे खेडोपाडी असंख्य प्रयोग झाले. स्वतःच्या लेखनात दंग असलेल्या या साहित्यिकाने प्रसिद्धीची हाव धरलेली कधी दिसली नाही.

**वासुदेव विष्णु भट** हे मुंबईच्या मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या घडणीचे शिल्पकार. संग्रहालयाची नायगाव-दादरची इमारत त्यांच्या कर्तृत्वाने सिद्ध झाली. ग्रंथसंग्रहा-

लयांच्या चळवळीला वाहून घेऊन त्यांनी संग्रहालयाच्या उभारणीचे मोठे कार्य केले. दुर्मिळ ग्रंथ व त्यांचा संग्रह याबद्दलची त्यांची जाण फार चांगली होती. मराठीत प्रसिद्ध झालेले प्रत्येक पुस्तक संग्रहालयात असावे ही त्यांची धडपड होती. त्यांच्या आयुष्याच्या उत्तर कालात दैवाचे फासे फिरले आणि भटांना संग्रहालयापासून दूर व्हावे लागले. गेली काही वर्षे ते आजारीच होते.

अच्युत बर्वे आणि अरुण लिमये यांचे मृत्यू हे अकालीच म्हणावे लागतील.

**अच्युत बर्वे** हे ना. सी. फडक्यांच्या कादंबऱ्यांचे नायक शोभतील असे आकर्षक व्यक्तिमत्त्वाचे उमदे लेखक. त्यांच्या लेखनशैलीवरही फडक्यांच्या आकर्षक आणि लालित्यपूर्ण शैलीचा देखणा छाप होता. आयुष्याच्या ऐन उमेदीत 'यशवंत' मासिकाच्या कथास्पर्धेत त्यांनी पहिले पारितोषिक मिळविले. प्रसिद्धी माध्यमाच्या व्यवसायात त्यांनी दुर्मिळ यश मिळवूनही त्यांचा लेखकाचा पिंड त्यांना स्वस्थ बसू देत नव्हता. 'मातीचा वास', 'कॅलिडोस्कोप' आणि 'सुखदा' या अलीकडच्या यांच्या महत्त्वपूर्ण कादंबऱ्यांनी ते मराठी वाङ्मयात प्रतिष्ठित झाले होते. नव्या उमेदीचे लेखन त्यांच्या हातून आणखी व्हायचे होते, तेवढ्यात मृत्यूने त्यांच्यावर घाव घातला!

**अरुण लिमये** यांचा मृत्यू ही तर एक फार मोठी चटका देणारी गोष्ट. वैद्यकीय व्यवसायातील या बुद्धिमान अशा यशस्वी तरुणाने समाजसेवेसाठी आपला व्यवसाय सोडला आणि 'युक्रांद' या संघटनेत ते दाखल झाले. आणीबाणीमध्ये नासिकच्या तुरुंगात असताना त्यांना रक्ती कर्करोगाची बाधा झाल्याचे लक्षात आले. त्यानंतर गेली सात वर्षे ते मृत्यूशी हसतमुखाने सामना करीत समाजकार्य करीत राहिले. असाध्य रोगावर उपचारासाठी ते दोन वेळा अमेरिकेला जाऊन आले. त्यांच्या 'क्लोरोफॉर्म' या पुस्तकाने मराठी वाङ्मयात चांगलीच खळबळ उडविली. आणी-बाणीतील पत्रव्यवहार आणि इतर महत्त्वाचे वाङ्मय त्यांनी पोटतिडीकेने गोळा केले होते. ते प्रसिद्ध झाल्याचे पाहण्याचे भाग्य त्यांना लाभले नाही!

मराठी वाङ्मयाच्या या साऱ्या उपासकांना आमची विनम्र प्रणामांजली.

## नाथमाधव यांची जन्मशताब्दी

द्वारकानाथ माधव पितळे ऊर्फ नाथमाधव यांची जन्मशताब्दी एप्रिल महिन्यात होऊन गेली. त्याची दखल मोठ्या प्रमाणावर घेतली जाणे आवश्यक होते. लष्करी पेशातला एक उमदा, तगडा जवान, विवाह ठरवून, आपल्या अधिकाऱ्याच्या आग्रहा-मुळे सिंहगडावर शिकारीला जातो आणि धुक्यामुळे कड्यावरून कोसळून कायमचा पंगू होतो. विरंगुळा म्हणून तो लिहायला लागतो आणि विपुल लेखन करून साहित्या-मध्ये चिरस्थायी होतो, ही घटना अद्भुताच्या कोटीतील गणावी लागेल.

नाथमाधवांनी हरी नारायण आपटे यांच्या लेखनाने प्रेरणा घेऊन केरळकोकिळकार

अनुक्रमणिका

आठल्ये यांच्या मार्गदर्शनाने लेखनास सुरुवात केली आणि सुमारे वीस वर्षे मृत्यूपर्यंत सातत्याने लेखन केले. डॉ. भांडारकरांनी त्यांना विशिष्ट हेतूने लेखन करण्याची प्रेरणा दिली. 'वीरधवल', 'डॉक्टर', 'देशमुखवाडी', 'विहंगवृंद', 'रायक्लव अथवा सोनेरी टोळी' या त्यांच्या कादंबऱ्या आणि त्यांच्या अद्‌भुताने भरलेल्या परंतु रियासतकारांच्या मार्गदर्शनाने ऐतिहासिक कागदपत्रांच्या अभ्यासाने सिद्ध झालेल्या ऐतिहासिक कादंबऱ्या अजूनही मोठ्या प्रमाणात वाचल्या जातात. हे त्यांचे यश त्यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षात रसिकांनी लक्षात ठेविले पाहिजे.

## नानासाहेब गोरे आणि गणपतराव जाधव यांचे अभीष्टचिंतन

नानासाहेब गोरे हे १५ जूनला आपले अमृत महोत्सवी वर्ष पुरे करून ७६ व्या वर्षात प्रवेश करीत आहेत. नानासाहेबांचा पिंड राजकारणी असला तरी ते खरे हाडाचे साहित्यिक आहेत. मराठीत शैलीकार म्हणून ज्या फार थोड्या लेखकांना म्हणता येईल त्यात नानासाहेबांची गणना होते. साहित्य-परिषदेचे नानासाहेब काही वर्षे अध्यक्षही होते.

कोल्हापूर येथे 'दैनिक पुढारी' चे संपादक गणपतराव जाधव यांचा 'अमृत महोत्सव' भव्य स्वरूपात साजरा झाला. जिल्हा-तालुका पातळीवरील दैनिकांची एक उज्ज्वल परंपरा गणपतरावांनी निर्माण केली.

नानासाहेबांना व गणपतरावांना त्यांच्या भावी आयुष्यात शुभेच्छा.

## दत्तोपंत डावरे : ८० पूर्ण

परिषदेचे अहमदनगर येथील निष्ठावंत कार्यकर्ते व परिषदेचे माजी कार्यवाह दत्तोपंत डावरे यांनी ३ मे रोजी आयुष्याचे ८० वर्षे पूर्ण करून ८१ व्यात पदार्पण केले आहे. त्यांचे हार्दिक अभिनंदन.

## महामंडळाचे अध्यक्ष गजमल माळी

मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष म्हणून प्राचार्य गजमल यांची निवड झाली आहे. महामंडळाच्या अध्यक्षांत ते सर्वांत तरुण आहेत. त्यांना आमच्या शुभेच्छा.

## साहित्य संमेलनांचा व साहित्य चर्चेचा वाढता उत्साह

गेल्या महिन्यात कोल्हापूर येथे परिषदेचे उपाध्यक्ष ग. ल. ठोकळ यांच्या अध्यक्षतेखाली 'दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन', नेवासे येथे नानासाहेब गोरे यांच्या अध्यक्षतेखाली 'ग्रामीण मराठी साहित्य संमेलन' आणि नासिक येथे राजा राजवाडे यांच्या अध्यक्षतेखाली नवोदितांचे साहित्य संमेलन अशी तीन संमेलने भरली होती. गुहागर येथे प्रसिद्ध प्रकाशक ग. पां. परचुरे यांचा स्मृतिदिन मुंबई-पुण्याच्या अनेक नामवंत साहित्यिकांच्या उपस्थितीत साजरा झाला. वसंत व्याख्यानमालेचे शंभरावे

अनुक्रमणिका

ज्ञानसत्रही थाटात पार पाडले. केशवराव कोठावळे यांच्या मॅजेस्टिक गप्पांना यंद दहा वर्षे पूर्ण झाली.

जून महिन्यात भाई माधवराव बागल यांचा अध्यक्षतेखाली 'अखिल भारतीय दलित साहित्य संमेलन' अहमदनगर येथे साजरे झाले.

या संमेलनांच्या निमित्ताने मराठी साहित्याची जाण व त्याचे प्रेम जितेजागते राहण्यास मदत होते यात शंका नाही.

परिषद या संमेलनांच्या संयोजकांबद्दल कृतज्ञता व्यक्त करीत आहे.

## कानडी साहित्यकांची आततायी, अविचारी कृती

कानडी भाषेला कर्नाटकात सक्तीचे आणि आग्रस्थान देऊन इतर भाषांना दुय्यम किंवा त्याहीपेक्षा खालच्या दर्जाचे स्थान देण्यासंबंधीची कर्नाटक राज्यातील साहित्य व संस्कृतिक क्षेत्रातील व्यक्तींनी चालविलेली चळवळ आततायी व अविचारी स्वरूपाची आहे, यात कसलीही शंका नाही.

भाषावार प्रांतरचनेची जी विषारी फळे येण्याची भीती व्यक्त करण्यात आली होती त्याचे हे प्रत्यंतर होय. संस्कृतला कानडीबरोबर जे स्थान पूर्वीपासून चालत आले होते ते काढून संस्कृतला तिय्यम दर्जाचे स्थान देण्याचा फतवा अरस-शासनाने काढला. त्याविरुद्ध संस्कृतचे अभिमानी कोर्टात गेले आणि त्यांनी स्थगिती मिळविली. त्यामुळे गुंडूरावाच्या कारकीर्दीत या प्रश्नाचा विचार करण्यासाठी 'गोकाक समिती' नेमण्यात आली. प्रिं. गोकाक हे महाराष्ट्राशी अत्यंत निगडित असे गृहस्थ परंतु त्यांच्या समितीने जो अहवाल दिला तो पाहून 'ब्रूटस्-यू टू' असे म्हणण्याची पाळी आली आहे. गोकाक समितीने कानडी तिसऱ्या इयत्तेपासून सर्वत्र आणि सक्तीचे करावे अशी शिफारस केली. अल्पसंख्यांकांना म्हणजे मराठी, तामीळ, तेलगू, हिंदी इ. भाषकांना आठवीपर्यंत सवलत देण्यात येऊन त्यांनाही नववीपासून कानडी भाषा सक्तीची करावी, असे सांगितले.

शासनाने हा अहवाल जसाच्या तसा न स्वीकारता शालान्त परीक्षेपर्यंत अशी सक्ती करू नये अशी सुज्ञपणाची भूमिका घेतली. त्याविरुद्ध तेथील साहित्यिकांनी चळवळ सुरू केली आहे. गोकाक समितीचा अहवाल जशाच्या तसा स्वीकारावा, असे त्यांचे म्हणणे आहे!

हाच प्रकार प्रत्येक राज्यात सुरू झाला तर काय होईल याचा विचार हे साहित्यिक करीत असताना दिसत नाहीत.

राष्ट्रभाषेकडे दुर्लक्ष, इंग्रजी भाषेच्या गुलामीची जोखड झुगारून न देण्याची मानसिक दुर्बलता यांचा हा अपरिहार्य परिणाम आहे.

राष्ट्रीय एकात्मतेवर हा मोठा आघात होय. राष्ट्राने हा धोका वेळीच ओळखला

नाही तर भाषिक प्रश्नांमुळे राष्ट्र दुभंगण्याची शक्यता निर्माण झालेली पाहण्याचे आमच्या नशिबी आल्याखेरीज राहणार नाही.

### या अंकाची सिद्धता

समर्थांच्या स्मृतिदिनाच्या त्रिशताब्दी संस्मरणानिमित्त समर्थांच्या शिकवणुकीचा वेगळेपणा स्पष्ट करणारा डॉ. मालशे यांचा लेख आणि विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या मृत्युशताब्दिनिमित्त डॉ. द. न. गोखले यांचा चिपळूणकर व फुले या दोन महान पुरुषांच्या कार्याचा तौलनिक विचार करणारा लेख हे या अंकाचे दोन विशेष होत. गोखले यांच्या लेखाचे महत्त्व लक्षात घेऊन त्यावर प्रतिक्रिया मागविल्या होत्या. शंकरराव खरात, डॉ. वाळिंबे, श्री. ग. माजगावकर, प्रा. सीताराम रायकर आणि डॉ. य. दि. फडके यांच्या प्रतिक्रिया हाती आल्या नाहीत, म्हणून त्या प्रसिद्ध होऊ शकल्या नाहीत.

गेल्या वर्षी वसंत व्याख्यानमालेत 'नाना फडणीस, दोनशे वर्षांची पोटदुखी' या विषयावर मी व्याख्यान दिले. त्यानंतर अनेकांनी नाना फडणिसांचे आत्मचरित्र मला मागितले. त्याची आत्यंतिक दुर्मिळता लक्षात घेऊन या अंकात ते संपूर्णपणे छापले आहे.

### पत्रिकेचा नवा संसार

वाढत्या महागाईमुळे साहित्य-पत्रिकेसाठी होणारा वाढता खर्च परिषदेच्या दृष्टीने चिंता करावी अशा स्वरूपाचा ठरला आहे. गेल्या वर्षी परिषदेवर पत्रिकेच्या खर्चाचा जो बोजा पडला आहे तो तर अधिकच काळजी करण्यासारखा आहे. त्यामुळे पत्रिकेचे अंक नियमित, परंतु आटोपशीर स्वरूपात काढण्याचे आम्ही ठरविले आहे. पत्रिकेचे मुद्रक श्री. चिं. स. लाटकर यांच्या सौष्ठवपूर्ण मुद्रण दृष्टीचा फार मोठा उपयोग पत्रिकेला सतत होत असतो. त्या भरवशावर पत्रिकेचे अंक अधिक आकर्षक स्वरूपात काढण्याची जिद्द आम्ही बाळगून आहोत.

पत्रिकेबद्दल अनेक प्रकारच्या अपेक्षा पत्रद्वारे असंख्य वाचकांनी व्यक्त केल्या आहेत. त्यांचा जरूर विचार करण्यात येईल.

पत्रिकेच्या लेखांमध्ये विविधतेबरोबर गुणवत्तेकडे अधिक लक्ष देणे आवश्यक आहे, असे मला वाटते. त्या दृष्टीने प्रयत्न जरूर करण्यात येईल. पत्रिकेचे जे काही विशेष अंक काढण्याचे आम्ही योजिले आहे. त्याचा वाढता खर्च भागविण्यासाठी जाहिराती मिळविण्याचे 'जाहिरात समिती' झटून कार्य करीत आहे. त्याची सुरुवात घरापासूनच व्हावी या प्रेरणेने कार्यकारी मंडळाच्या सदस्यांनी म्हणजेच घरच्याच मंडळींनी या अंकासाठी काही जाहिराती दिल्या आहेत.

परिषदेच्या सभासदांचे सहकार्यही याबाबतीत मिळेल अशी आशा आहे.

**भीमराव कुलकर्णी**

अनुक्रमणिका





# औदुंबराच्या छायेत ४० वर्षे

## १५ जून १९४२

गिरगावात मॅजेस्टिक चित्रपटगृहाजवळ
औदुंबराच्या छायेत
ग्रंथविक्रीचे एक छोटेसे दुकान सुरू झाले.

**मॅजेस्टिक बुक स्टॉल**

ग्रंथविक्रेते म्हणून ' मॅजेस्टिक 'चे नाव आता सर्वश्रुत आहे.
मराठी ललित साहित्याच्या विक्रीसाठी उघडलेली दालने,
भरविलेली प्रदर्शने आणि आयोजित केलेल्या ' साहित्यिक गप्पा '
अशा अनेक अभिनव ' मॅजेस्टिक ' उपक्रमांचा
आवर्जून उल्लेख केला पाहिजे.

१९४७ ग्रंथप्रकाशनास प्रारंभ
गेल्या ४० वर्षात ८००हून अधिक पुस्तकांचे प्रकाशन
त्यापैकी अनेक पुस्तकांना लोकमान्यता आणि राजमान्यताही.

१९६९ मध्ये लॉटरी तिकिट-विक्री व्यवसायात पदार्पण.
लोकांच्या अलोट विश्वासामुळे अल्पावधीतच घवघवीत यश.

## १५ जून १९८२

आज मॅजेस्टिक आपल्या सेवेची ४० वर्षे पूर्ण करून
४१ व्या वर्षात पदार्पण करीत आहे.
या शुभप्रसंगी आम्ही आमचे ग्राहक, सहकारी, व्यावसायिक,
लेखक, मित्र आणि हितचिंतक यांना
विनम्र भावाने अभिवादन करीत आहोत.

**मॅजेस्टिक बुक स्टॉल**

अनुक्रमणिका

# नाना फडणिसांचे आत्मचरित्र

**प्रस्तावना**

मध्ययुगीन काळातील कर्त्या पुरुषांनी लिहिलेली फारच थोडी आत्मचरित्रे मराठीत उपलब्ध आहेत. त्यांपैकी राजकारणधुरंधर नाना फडणिसांचे आत्मनिवेदन अनेक दृष्टीने महत्त्वाचे आहे. आत्मनिवेदनाची मूळ प्रत कॅप्टन ब्रुक याने नानांच्या मेणवली दप्तरातून लंडनला नेल्याचा उल्लेख सापडतो. मात्र महत्त्वाच्या कागदपत्रांच्या नकला करून ठेवण्याच्या तत्कालीन प्रवृत्तीमुळे या आत्मचरित्राची एक प्रत नकलेसाठी हैदराबादेस आली असता त्याची नक्कल वामन बाळकृष्ण दीक्षित यांनी करून घेऊन शंभर वर्षांपूर्वी 'काव्येतिहाससंग्रह' या मासिक पुस्तकात ती प्रसिद्ध केली आहे. टोक्याचे गोपाळ महादेव भोगले यांनी शके १७७१ मध्ये मूळ प्रतीची नक्कल करून ठेविल्याचे दिसते. उपलब्ध आत्मवृत्ताचे मूळ साधन म्हणजे ही भोगल्यांची नक्कल होय. मूळ प्रतीचा लंडनवरून शोध अद्याप लागला नाही.

हे आत्मनिवेदन आकाराने फार मोठे नाही. अगदी आटोपशीर आहे. परंतु त्याचा व्याप मात्र फार मोठा आहे. नानांचा जन्म माघ कृ० ४, शके १६६३, ता. १२ फेब्रु. १७४२ चा आणि त्यांचा मृत्यू १३ मार्च १८०० चा. त्यांचे संपूर्ण नाव बाळाजी जनार्दन भानु. 'नाना' हे त्यांचे घरगुती अभिधान आणि फडणीस ही त्यांची वृत्ती. त्यामुळे नाना फडणीस हेच नाव कालांतराने सर्वतोमुखी झालेले दिसते. नानांच्या वयाच्या दहाव्या वर्षापासून माधवराव पेशव्यांनी राज्यसूत्रे हाती घेतली तेव्हापर्यंतची म्हणजे त्यांच्या वयाच्या १९ व्या वर्षापर्यंतची हकीकत यात आहे.

हे आत्मनिवेदन नानांनी केव्हा व कशासाठी लिहिले असा प्रश्न साहजिकच मनात उभा राहतो. नानांनी पानिपत्तोत्तर काळात लगेच म्हणजे जुलै १७६१ मध्ये लिहिले अशी बऱ्याच जणांची समजूत आहे. ती मला बरोबर वाटत नाही. कारण आपल्या आयुष्याच्या उत्तरकाळात गतकाळातील घटनांचे वेगवेगळ्या संदर्भातून पुनरावलोकन करून आत्मपरीक्षण करण्याचा नानांना छंद आहे, हे लक्षात येते. उदाहरणार्थ, आपल्या आयुष्यातील संकटप्रसंगांचे चित्रण करणारे नानांच्या हातचे टिपण उपलब्ध आहे; ते सन १७८३ मधले आहे. (ऐतिहासिक टिपणे भाग १ ते ३७). हे आत्म-निवेदनही त्याच प्रकाचे असून या टिपणामध्ये आपल्या आयुष्यातील द्वंद्वाचे प्रामुख्याने चित्रण केले आहे. आत्यंतिक धर्मभावना आणि प्रखर कामभावना यांच्या कोंडीत सापडलेल्या आपल्या व्यक्तिमत्त्वाची कोंडी पेशव्यांच्या आपल्याबद्दलच्या लोभामुळे कशी फुटली आणि परिणामी आपण राजकारणाकडे कसे झुंपलो गेलो, याबद्दलचे हे निर्भीड आत्मनिवेदन आहे आणि आत्मपरीक्षणही आहे.

अनुक्रमणिका

मराठी साम्राज्याचे कर्तव्यदक्ष हितकर्ते म्हणून आपल्या बुद्धिवैभवाच्या बळावर नानांनी इंग्रजांसारख्या आधुनिक राज्यकर्त्यांना सुमारे पावशतकभर ज्या कर्तृत्वाने रोखून धरले होते, त्यामुळे इंग्रजांनी त्यांच्या कर्तृत्वावर कलंक लावण्यासाठी पद्धतशीर-पणे त्यांच्या चारित्र्यहननाचे शतकभर प्रयत्न केले. राजकारणाची सूत्रे बारकाईने लक्षात न घेणाऱ्या मोरोबा कान्होबासारख्या इंग्रजधार्जिण्या गृहस्थांनी 'घाशीराम कोतवाल' ही कादंबरी १८६१ मध्ये लिहून नानांच्या चारित्र्यहननावर कायमचे शिक्कामोर्तब केले. त्यामुळे नानांच्या कर्तृत्वाचे चित्र पुसले जाऊन मराठी ललित वाङ्मयाने त्यांना काळ्या पडद्यावर उभे केले.

नानांचे हे आत्मनिवेदन बारकाईने वाचल्यानंतर पूर्वायुष्यातील आपल्या मनातील कामवासनेचा पूर्ण निचरा करून उत्तरायुष्यामध्ये पूर्णपणे राजकारणाला निष्ठेने वाहून घेण्यामागची भूमिका नानांना स्पष्ट करावयाची असेल हे नाकारता येणार नाही. धर्मभावना आणि कामवासना या परस्परविरुद्ध भावनांचा कल्लोळ मनात उसळला असता आत्मपरीक्षण करून आपल्या मनातील कामवासनेचा निचरा करण्याच्या प्रयत्नास कोणत्या गोष्टी कशा कारणीभूत झाल्या हेच यात नानांना प्रामुख्याने सांगा-वयाचे आहे. त्यामध्ये विलक्षण स्पष्ट आणि निःसंकोच अशी धारणा आहे आणि त्यामध्ये कमालीचा प्रांजळपणा आहे. ज्याची आत्मनिष्ठा व आत्मधारणा प्रबळ आहे अशा एका अंतर्मुख वृत्तीच्या कर्त्या पुरुषाचे एक त्याला स्वतःस उघड करणारे व वाचकांना धक्का देणारे आत्मनिवेदन आहे. महात्मा गांधींनी ज्याप्रमाणे उत्तरा-युष्यात आपल्या पूर्वायुष्यातील 'आपले सत्याचे प्रयोग' हेच आपल्या आत्मनिवे-दनाचे उद्दिष्ट मानले, त्याचप्रमाणे नानांनीही उत्तरायुष्यातील आपल्या वैभवाच्या काळात पूर्वायुष्यातील आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीचा झाडा घेतला. असा झाडा घेण्यास असाधारण धैर्य लागते. नानांच्या कर्तृत्वशाली कारभारांमागे हे लोक-निंदेला न जुमानणारे असीम धैर्य आहे.

नानांनी या आत्मनिवेदनाच्या सुरुवातीला थोडीशी वेदांती चर्चा केली आहे. त्यातील निर्भत्सना हाही तत्कालीन वेदांत विचाराचा एक भाग. मात्र त्याचा उपयोग नानांनी आपल्या तत्कालीन मनःप्रवृत्तीचे चित्रण करण्यासाठी मार्मिकपणे करून घेतला आहे नाना म्हणतात की, लहानपणी अज्ञानामुळे जीवनानुभव दुबळा व सारखे देवपूजेत मन रमल्यामुळे शरीरही दुबळे. देवपूजेच्या नादामुळे आईकडून सतत मार खावा लागत असल्याचे ते सांगतात. आई-वडिलांनी देवपूजेचा नाद आपण सोडावा म्हणून जो खरपूस मार दिला, त्यामुळे आईवडिलांचे आपण अनिष्ट चिंतीत असू असे नाना सांगतात. त्यांच्या या नादामुळेच दहाव्या वर्षी नानांचा विवाह मोठ्या अडचणीतून पार पडला असावा. अकरा-बारा वर्षांनंतर शरीरी कामाविर्भाव होऊ लागला. रेत-स्खलनही व्यर्थ करू लागलो. ही नानांची स्पष्ट कबुली अनन्यसाधारण स्वरूपाची आहे.

लोकांना नाना देवपूजक दिसत होते आणि लोकांना न दिसणाऱ्या कामपीडेने त्यांना कसे घेरले होते, याचे येथील चित्रण लक्षणीय आहे. घोड्यावर बसावे, तलवार चालवावी असे घरच्या माणसांना व पेशव्यांना वाटायचे. त्या नादात घोड्यावरून पडून नाना दोन दिवस बेशुद्ध पडले. बरे झाल्यानंतर त्यांच्या वयाच्या पंधराव्या वर्षी वडिलांचे निधन झाले. पित्याच्या और्ध्वदेहिक करण्याच्या काळातच 'पापदृष्टी एक समयी जहाली, हा अपराध झाला,' या अपराधाच्या जाणिवेने आपल्या शरीराचे कसे व्यर्थ हाल झाले आणि त्यातून सुटण्यासाठी आपण काय विलक्षण धडपड केली याचे नाना वर्णन करतात. तारुण्यमुलक्ष कामभावनेच्या वर्चस्वापुढे मनाला कशी बोचणी लागली, हे ते सांगतात. याच काळात पेशव्यांच्या बरोबर श्रीरंगपट्टणपर्यंत जाण्याचा नानांना योग आला. तेथून आल्यावर, 'रमणीयोग मात्र अज्ञानच तेणेंकरून जाहला. तेणेकरून पापबुद्धी सुटेना,' अशी कबुलीही ते देतात.

आपण इतकी देवपूजा करतो, इतका मनाला आवर घालण्याचा प्रयत्न करतो, स्वपत्नीखेरीज विचार मनात आणावयाचा नाही असे म्हणतो, आणि तरी ही कामवासना सुटत नाही याचे कारण? असा विचार नानांच्या मनात येतो आणि ते या गोष्टी-मागची कारणपरंपरा शोधण्याचा प्रयत्न करतात. मानसशास्त्रीय दृष्टया नानांचा हा प्रयत्न लक्षात घेण्यासारखा आहे. विचाराअंती नानांना आपल्यातील अतिरिक्त काम-वासना आपल्या मातुल घराण्यातून आली असे वाटते. हे नानांचे मातुल म्हणजे बळवंतराव मेहेंदळे. ते पानपतावर मारले गेले. आणि त्यांची पत्नी रणांगणावर सती गेली. या घटनेचे चित्र नाना अगदी थंडपणाने का करतात हे त्यावरून लक्षात येते. भाऊसाहेबांच्या बखरीतील या प्रसंगाच्या उत्कट चित्रणाच्या पार्श्वभूमीवर ताडून पाहिले तर हे चित्र अर्थपूर्ण वाटते!

उदगीरच्या लढाईत नाना नव्हते. परंतु पानिपतावर जावयाचे भाऊसाहेब पेशवे ठरवितात, तेव्हा ते नानाला बरोबर घेतात. पेशवे या दुबळ्या मुलाला बरोबर घेऊन त्याला राजकारणाच्या गाड्याला जोडण्याचा सतत प्रयत्न करीत असताना दिसतात. नाना भाऊंबरोबर पानिपतावर गेले ते मात्र आपल्याला तीर्थयात्रा करावयास मिळणार या अपेक्षेने! पानिपतावर जाण्यापूर्वी नाना टोक्याला जाऊन अतिरुद्र करीत बसले होते. आणि त्यांची देवपूजेची वृत्ती पराकोटीला गेली होती. याच काळात त्यांच्या मनात इतके प्रखर वैराग्य बाणले की 'परस्त्री मनांतही येऊ देऊ नये म्हणून पाहणे कोठील?' अशी त्यांची मनःस्थिती झाली. नानांना या भलत्या व्यापातून बाहेर काढण्यासाठी पेशव्यांनी त्यांना उत्तरेस जाण्यास निमंत्रण केले. नाना म्हणतात की, 'मातोश्री व कुटुंबसहवर्तमान भाऊंबरोबर हिंदुस्थानांत जाऊन स्वर्गंगा त्रिपथे भगीरथीचे स्नान त्रिस्थली यात्रा करावी, अंतःकरण शुद्धी होईल. या भावनेकरून गेलों.'

नानांना प्रवासात अनारोग्यामुळे खूप त्रास झाला. 'आंवेची व्यथा बहुत.

उठावयास शक्ति नाहीं. रेचन बहुत, ग्लानी फार...' अशी अवस्था झाली असता भाऊंची ममता विशेष म्हणून त्यांनी बहरात आलेल्या सैन्याच्या मजला नानांसाठी थांबविल्या. राजकारणापेक्षा पेशव्यांनी नानांच्या प्रकृतीला विशेष मानले. एकीकडे मोठमोठी युद्धे चालली असता नाना मात्र स्नाने, दाने आणि तीर्थयात्रा यांत दंग आहेत. चर्मण्वतीच्या तीरी ग्रहण पडल्यामुळे नानांनी मोठा दानधर्म केला. मुक्तिपुरी मथुराक्षेत्री क्षौरप्रायश्चित्त श्राद्धादिक कार्ये घडली. वृंदावनात जेथे जेथे कृष्णलीला घडल्या त्यांचे दर्शन घेत, कुंजविहार, शृंगारवन, वंशीवन, कुंजवन, सेवावन इ. ठिकाणे पाहत असता नानांना क्षणभर श्रीकृष्णलीला डोळ्यांनी पाहत असल्याचा भास झाला. यमुनाकाठची वाळू नानांनी हाती घेतली. कालिंदीतीरीच्या यात्रेतील धुंद अवस्थेचे चित्र रेखाटून कृतकृत्य झालेले नाना हर्षनिर्भर शब्दांत वर्णितात की 'अनेक जन्मांचें पुण्य असें कीं, असें वृंदावन दृष्टीस पडलें, तेणेंकरून भगवंताच्या मूर्ती व भगवद्‌भक्त यांचे दर्शन करून नेत्र पवित्र झाले. पादेंकरून चालत गेलों तेणेंकरून पायांचे सार्थक झालें. हस्तेंकरून नमस्कार करतां जालों तेणेंकरून हस्त पवित्र झालें. मुखें करून नामस्मरण केलें तेणेंकरून मुख पवित्र झालें. कर्मेंकरून भगवत्श्रवण झालें तेणेंकरून श्रोत्र पवित्र झाले. स्नानें करून सर्व देह पवित्र झाले...' या वर्णनातील लयबद्ध आंदोलने लक्षात राहण्यासारखी आहेत.

या तीर्थयात्रांमध्ये नानांना फार काळ कंठता आला नाही. कारण लगेच राजकारण सुरू झाले. दिल्ली काबीज केल्यानंतर भाऊंनी जवानबख्त नावाचा शहाजादा गादीवर बसविला. त्याच्या दरबारात इतरांप्रमाणे भाऊंनी नानांनाही सन्मानवस्त्रे देवविली. कुंजपुऱ्याच्या मोहिमेत भाऊंनी नानांना बरोबर घेतले. तेथे ईश्वरकृपेने आपण वाचलो, असे नानांना वाटते. त्यानंतरच्या पानिपतच्या युद्धाचे वर्णन नाना करतात आणि भाऊंनी आपली युद्धाची रीत सोडल्याने आपला पराभव झाला असे नानांना वाटते. बळवंतराव मेहेंदळे, नाना पुरंदरे यांचे न ऐकता भाऊ उत्तर हिंदुस्थानातील मुत्सद्यांच्या आहारी गेले असे नाना सांगतात. 'आप्त होते बळवंतराव मातुल व नाना पुरंधरे ते अनाप्त झाले. जे अनाप्त शहानवाजखानी, भवानी शंकर वगैरे ते आप्त जाले' अशी मोठी खोचक टीका नाना करतात. राजकारणपटुता आणि त्याचे निर्भीड प्रतिपादन यांचे या ठिकाणी चांगले दर्शन घडते.

युद्धात विश्वासराव पडल्यानंतर पळणाऱ्यांनी नानासही पळा म्हणून सांगितले, परंतु भाऊंना सोडून पळवेना. शेवटी परमेश्वरानेच बुद्धी दिली म्हणून पळालो, असे नाना सांगतात. 'श्रीमंत अति बुद्धिवान, शूर, कृतकर्मे, गर्व मात्र विशिष्ट परंतु तर्तूद फारच सैन्याची वगैरे केली' या एकाच वाक्यात नानांनी केलेले भाऊंचे मूल्यमापन नानांच्या पक्व दृष्टीची जाणीव देणारे आहे.

पानिपतावरील लंगोटी लावून गवतात लपून राहणे, तीनचार वेळा मृत्यूच्या तडा-

ख्यातून सुटणे, अंगास राख लावून वैरागी होणे, हा भाग 'ईश्वरें तृणेंकरून रक्षिलें' या नावाने क्रमिक पुस्तकातील उताऱ्यांतून सर्वांना ज्ञात झाला आहे. संपूर्ण आत्मचरित्राच्या अवलोकनाने त्याची संगती आता चांगल्या रीतीने वाचकांना लागू शकेल.

नानांची पळापळ, त्यांना ठिकठिकाणी झालेली मदत, पळताना भुकेचे झालेले विस्मरण, नंतर सुग्रास अन्न जेवूनही भुकेने मांडलेले थैमान आणि शेवटी वराणपुरावर नानासाहेब पेशव्यांची भेट हा सर्व भाग अत्यंत नाट्यपूर्ण आहे. वैराग्याने नाना काशीस जावयास निघतात, बाकीचे त्यांना जाऊ देत नाहीत. नानासाहेब पेशव्यांची भ्रमिष्ट अवस्था, त्यांनी नऊ वर्षांच्या मुलीशी दुसरे लग्न केल्यामुळे गोपिकाबाईंची झालेली मनोवस्था, माधवराव पेशव्यांबरोबर नानाला भोजनास बसवून त्यांनी दुसऱ्या पत्नीकडून वाढण्याची केलेली व्यवस्था, पत्नी पळून सुखरूप आल्याचा आनंद, आई यवनांकडून पानपतावर मारली गेल्याचे दुःख आणि ते सारे विसरण्याकरता टोक्यास जाऊन राहण्याची नानांची विरक्त वृत्ती या सर्वांचे मनोवेधक चित्रण नाना करतात. नानांना एकटे राहण्याचे नशिबी नव्हते. नानासाहेब पेशव्यांचे पुण्यास पर्वतीवर निधन झाल्याचे कळताच, निरोपानुसार त्यांना पुण्यास जावे लागते. तेथे तरुण माधवरावांबरोबर साताऱ्याला पेशवाईची वस्त्रे आणण्याकरता त्यांना जावे लागते. नाना वस्त्रे घेण्याकरता राजद्वारी जाण्यास ठाम नकार देतात; कारण आपली निष्ठा पेशव्यांशी आहे, असे त्यांना वाटते. परत येताना शेतामध्ये काम करीत असलेल्या स्त्रीवर एक गारदी बलात्कार करण्याच्या प्रयत्नात असता राऊताने त्याला भाल्याने नेमके टिपले; तेव्हा कामवासना काय विपरित प्रकार करू शकते या कल्पनेने नाना अवस्थ होतात. नीरा नदी उतरून माधवराव पलीकडे गेल्यानंतर देवपूजेत गुंतलेले नाना दुसऱ्या दिवशी नावेतून नदी उतरण्याचा प्रयत्न करतात. पुरामुळे नाव उलटते. अनेकजण मृत्युमुखी पडतात. नाना कसेबसे जिवंत राहतात आणि माधवरावांच्या आज्ञेने पुढे निष्ठेने फडणिसी दप्तर पाहू लागतात. इथे हे आत्मनिवेदन संपते.

धर्मभावना, कामभावना यांच्या कोंडीत सापडलेल्या तरुणाला परिस्थितीने आणि पेशव्यांच्या जिव्हाळ्याने मार्गावर आणले आणि त्यातूनच एक मोठा मुत्सद्दी निर्माण होण्याची परिस्थिती निर्माण झाली !

आकाराने छोटे असलेले हे आत्मनिवेदन अत्यंत, प्रौढ, पक्व वृत्तीचे असून त्यातल्या आत्मपरीक्षणाच्या सूक्ष्म धाग्यांनी मोठे बहारदार झाले आहे. तरुण इतिहासाभ्यासकांना, मनोवैज्ञानिकांना, आणि वाङ्मयाभ्यासकांना ते आव्हानासारखे उभे आहे. ते आव्हान त्यांनी पेलावे म्हणून हे आत्मनिवेदन येथे संपूर्णपणे प्रसिद्ध करण्यात येत आहे.

**भीमराव कुलकर्णी**

अनुक्रमणिका

## ॥ संहिता ॥

॥ श्रीकृष्णप्रसन्न ॥

श्रीसांबसदाशिवायनमः । जो सांबसदाशिव कसा आहे कीं, सत्वरूप. म्हणजे असें: चित्स्वरूप प्रकाश अवस्था-त्रय साक्षी. जाग्रत कालीं त्यास विश्व, स्वप्नकालीं तैजस, सुषुप्तीकालीं प्राज्ञ असें ज्यास ह्मणतात. जो एकच आत्मा उपाधि-भेदें करून नाना प्रकारें भासतो. पाय नसतां चालतो. डोळे नसतां पाहतो. हात नसतां घेतो. कान नसतां ऐकतो. सर्वांतर्यामीं व्यापक. हें कशावरून ? तर, दूर कोणी इंगितज्ञ बसला असतो त्याचा याचे आत्म्यांत [ आरशांत ? ] प्रतिबिंबित होऊन तीच गोष्ट घेतो. व्यापकते व्यतिरिक्त कसें घडेल ? असा आत्मा त्यासच आपणांत विसरून आनंद-स्वरूप सोडून दुःखांतील सुख भोगावयाची इच्छा धरितो. हेच त्या आत्म्याची माया. सत्य ह्मणता नये, असत्य ह्मणतां नये. जिचें स्वरूप अनिर्वचनीय. सत्त्व, रज, तमोगुणी. तिजपासून अहंकार, आकाश, वायु, तेज, उदक, पृथ्वी पंचमहाभूतें महत्तत्त्व. ह्मणजे अंतःकरण तदवच्छिन्न जें चैतन्य जो जीव अपंचीकृत पंच महाभूतें करून तदंशरूपें लिंगशरीरद्वारा जीवास सुख दुःखादि प्राप्ती. 'भोगायतनं शरीरं'-भोगाचें स्थान शरीर होय. या शरीराची उत्पत्ती तर जें निंद्यस्थान योनी, व पुंस स्थानापासून रेत ज्याचे स्खलनें करून व स्पर्शे करून स्नान करावें लागतें अशा निंद्य पदार्थापासून शरीर वृद्धीतें पावतें. गर्भीच लयातें पावलें तर गेलें, वांचलें तर आंत अनेक जंतूंचे उपद्रव व जठरस्थ अग्नीनें दाह इत्यादिक क्षुधा-तृषा समयीं परिमार्जन न होणें. असे क्लेश भोगितां प्रसव वायूकडून कष्टें करून जन्म जाहलें ह्मणजे जाताशौच प्राप्त. तदनंतर रोगादिक वेदना आपणच मुक्यानीं सोसाव्या. षड्भाव विकार-अस्ति, जायते, विपरीणमते, अपक्षीयते, नश्यति, हे षड्भाववत् विकार.

असा देही जो मी त्याला लहानपणीं अज्ञानें करून आवृत. परंतु पूर्व संस्कारें करून देवाची पूजा करावी हा छंद फार. याजकरितां** मातोश्रींनीं मारही दिला. परंतु संस्कार दृढ. विद्याभ्यासा करितां मातापितर जे यांची शिक्षा. तेणेंकरून लहानपणीं अज्ञानाकरितां चित्तास फार वाईट वाटून त्यांचेंही अनिष्ट चिंतीत असें. दाहावे वर्षी विवाह झाला. विघ्नें पडलीं असतां निर्विघ्न केलें.[1] पुढें अक्रा बारा वर्षा-नंतर कामाविर्भाव शरीरीं होऊं लागला. तेणेंकरून व असत्समागम किंचित् झाला. तेणेंकरून पापप्रवृत्ती होऊं लागली. रेतस्खलनही व्यर्थ करू लागलों. मध्यें घोड्या वरून पडलों. अति अवस्था कठीण. दोन दिवस शरीरभान नाहीं. या प्रमाणें जालें असतां गोविंद जो त्याचे कृपेनें बरें केलें.

१. मुलगा देवदेव करतो म्हणून लग्न होण्यात विघ्ने आली असे दिसते.

पुढें पंधरावे वर्षी पित्याचा [२] काळ झाला. त्यांचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें. त्यांत पापदृष्टी एक समयीं जहाली. हा अपराध झाला. व्यर्थ रेतस्खलनें करून पाप व शरीर-नाश समजूं लागलें. तेव्हां सोडून देऊन निश्चय केला. परंतु कामाविर्भाव विशेष, येणें करून पापबुद्धी होत असे. पुढें परंपरा[३] सेवाधर्म चालावा या योगें व श्रीमंतांची कृपा पुत्रवत् असें जाणून कर्नाटक प्रांतीं श्रीरंगपट्टण [४] पर्यंत गेलों. परंतु प्रत्यहीं स्वप्नावस्था होऊं लागली. पुढें घरीं आलियावर रमणीयोग मात्र अज्ञानच तेणेंकरून जाहला. परंतु पापबुद्धी निःशेष सुटेना. तेव्हां चित्तांत विचार केला कीं, पितामह [५] यांची बुद्धी धर्मशील असतां व सत्यवचनी एकनिष्ठ देव-ब्राह्मणांचे ठायीं परम भक्ती; सात्विक; निषिद्ध कर्म करणेंच नाहीं; असें असतां माझें चित्त पापाकडे थोडेसें कां जातें. ? याचा विचार करितां मातामह-पक्ष[६] अति व्यभिचारी, तो संस्कार आहे. बुद्धीचा निश्चय करावा तत्रापि स्थिरता राहूं नये. तेव्हां संस्कार बलवत्तर.

पुढें टोंक्यास अतिरुद्र करावयास गेलों. तेथें देवतार्चनानेम धरिला. परंतु शरीरीं पीडा तेणेंकरून वैराग्य असें कीं, पर स्त्री मनांतही येऊं देऊं नये. मग पाहणें कोठील ?

मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊंबरोबर हिंदुस्थानांत जाऊन स्वर्गगा त्रिपथ भागीरथीचें स्नान त्रिस्थली यात्रा करावी, अंतःकरण शुद्धी होईल, या भावनें करून गेलों. त्या कालीं चित्तास अति वैराग्य. याचें कारण शरीरीं किंचित् पीडा. तेणेंकरून चित्त अति वैराग्यशील जहालें. कीं, एक भगवंताची पूजा व ध्यान मात्र करावें. उष्ण शीत यांचीही पीडा. परंतु चित्तास नाहीं. मातेचे ठायीं भक्ती होत्साता चाललों. ते नर्मदा महागंगेमध्यें स्नान करून एका वृत्तीनें ध्यान केलें. त्या दिवसापासून उत्तरोत्तर वैराग्य अंतःकरण-शुद्धीच होत चालली.

भाऊंची ममता विशेष व आंवेची व्यथा बहुत जाहाली. उठावयास शक्ति नाहीं. रेचन बहुत, ग्लानी फार तेव्हां कूच जहाले असतां मुक्काम श्रीमंतांनीं करवावा. त्याकालीं ईश्वरें आरोग्य केलें.

पुढें दर मजल चरमन्वतीतीरीं गेलों. तेथें ग्रहण पडलें. स्नान-दानादिकें करून आत्मा पवित्र होत्साता ध्यानें करून कालक्षेप चालत असें. पुढे सूर्यतनया यमुना

---

२. पिता–जनार्दन बल्लाळ भानु.

३. परंपरेनें कसा चालत आला तें वंशावळ पहिली असता समजेल. पेशवे-बखर, संपा. का. ना. साने, पृ. १९ पहा. खेरीज भानूंचा व पेशव्यांचा घरोबा किती हेंही पे. ब. पृ. ११–१९ पाहिली असता ध्यानात येईल.

४. ही स्वारी १७५५।५६ त झाली ती. पे. ब. पृ. ६० टी. ६ पहा.

५. पितामह–बाळाजी महादेव भानु.

६. मातामह पक्ष–बळवंतराव मेहेंदळे.

## ॥ संहिता ॥

॥ श्रीकृष्णप्रसन्न ॥

श्रीसांबसदाशिवायनमः। जो सांबसदाशिव कसा आहे कीं, सत्त्वरूप. म्हणजे असें: चित्स्वरूप प्रकाश अवस्था-त्रय साक्षी. जागृत कालीं त्यास विश्व, स्वप्नकालीं तैजस, सुषुप्तीकालीं प्राज्ञ असें ज्यास ह्मणतात. जो एकच आत्मा उपाधि-भेदें करून नाना प्रकारें भासतो. पाय नसतां चालतो. डोळे नसतां पाहतो. हात नसतां घेतो. कान नसतां ऐकतो. सर्वांतर्यामीं व्यापक. हें कशावरून? तर, दूर कोणी इंगितज्ञ बसला असतो त्याचा याचे आत्म्यांत [ आरशांत? ] प्रतिबिंबित होऊन तीच गोष्ट घेतो. व्यापकते व्यतिरिक्त कसें घडेल? असा आत्मा त्यासच आपणांत विसरून आनंद-स्वरूप सोडून दुःखांतील सुख भोगावयाची इच्छा धरितो. हेच त्या आत्म्याची माया. सत्य ह्मणता नये, असत्य ह्मणतां नये. जिचें स्वरूप अनिर्वचनीय. सत्त्व, रज, तमोगुणी. तिजपासून अहंकार, आकाश, वायु, तेज, उदक, पृथ्वी पंचमहाभूतें महत्तत्त्व. ह्मणजे अंतःकरण तदवच्छिन्न जें चैतन्य जो जीव अपंचीकृत पंच महाभूतें करून तदंशरूपें लिंगशरीरद्वारा जीवास सुख दुःखादि प्राप्ती. 'भोगायतनं शरीरं'-भोगाचें स्थान शरीर होय. या शरीराची उत्पत्ती तर जें निंद्यस्थान योनी, व पुंस स्थानापासून रेत ज्याचे स्खलनें करून व स्पर्शें करून स्नान करावें लागतें अशा निंद्य पदार्थापासून शरीर वृद्धीतें पावलें. गर्भींच लयातें पावलें तर गेलें, वांचलें तर आंत अनेक जंतूंचे उपद्रव व जठरस्थ अग्नीनें दाह इत्यादिक क्षुधा-तृषा समयीं परिमार्जन न होणें. असे क्लेश भोगितां प्रसव वायूकडून कष्टें करून जन्म जाहलें ह्मणजे जाताशौच प्राप्त. तदनंतर रोगादिक वेदना आपणच मुक्यानीं सोसाव्या. षड्भाव विकार-अस्ति, जायते, विपरीणमते, अपक्षीयते, नश्यति, हे षड्भाववत् विकार.

असा देही जो मी त्याला लहानपणीं अज्ञानें करून आवृत. परंतु पूर्व संस्कारें करून देवाची पूजा करावी हा छंद फार. याजकरितां** मातोश्रींनीं मारही दिला. परंतु संस्कार दृढ. विद्याभ्यासा करितां मातापितर जे यांची शिक्षा. तेणेंकरून लहानपणीं अज्ञानाकरितां चित्तास फार वाईट वाटून त्यांचेंही अनिष्ट चिंतीत असें. दाहावे वर्षीं विवाह झाला. विघ्नें पडलीं असतां निर्विघ्न केलें.[1] पुढें अक्रा बारा वर्षा-नंतर कामाविर्भाव शरीरीं होऊं लागला. तेणेंकरून व असत्समागम किंचित् झाला. तेणेंकरून पापप्रवृत्ती होऊं लागली. रेतस्खलनही व्यर्थ करू लागलों. मध्यें घोड्या वरून पडलों. अति अवस्था कठीण. दोन दिवस शरीरभान नाहीं. या प्रमाणें जालें असतां गोविंद जो त्याचे कृपेनें बरें केलें.

---

१. मुलगा देवदेव करतो म्हणून लग्न होण्यात विघ्ने आली असे दिसते.

पुढें पंधरावे वर्षी पित्याचा [२] काळ झाला. त्यांचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें. त्यांत पापदृष्टी एक समयीं जहाली. हा अपराध झाला. व्यर्थ रेतस्खलनें करून पाप व शरीर-नाश समजूं लागलें. तेव्हां सोडून देऊन निश्चय केला. परंतु कामाविर्भाव विशेष, येणें करून पापबुद्धी होत असे. पुढें परंपरा[३] सेवाधर्म चालावा या योगें व श्रीमंतांची कृपा पुत्रवत् असें जाणून कर्नाटक प्रांतीं श्रीरंगपट्टण [४] पर्यंत गेलों. परंतु प्रत्यहीं स्वप्नावस्था होऊं लागली. पुढें घरीं आलियावर रमणीयोग मात्र अज्ञानच तेणेंकरून जाहला. परंतु पापबुद्धी निःशेष सुटेना. तेव्हां चित्तांत विचार केला कीं, पितामह [५] यांची बुद्धी धर्मशील असतां व सत्यवचनी एकनिष्ठ देव-ब्राह्मणांचे ठायीं परम भक्ती; सात्विक; निषिद्ध कर्म करणेंच नाहीं; असें असतां माझें चित्त पापाकडे थोडेसें कां जातें. ? याचा विचार करितां मातामह-पक्ष[६] अति व्यभिचारी, तो संस्कार आहे. बुद्धीचा निश्चय करावा तत्रापि स्थिरता राहूं नये. तेव्हां संस्कार बलवत्तर.

पुढें टांक्यास अतिरुद्र करावयास गेलों. तेथें देवतार्चनानेम धरिला. परंतु शरीरीं पीडा तेणेंकरून वैराग्य असें कीं, पर स्त्री मनांतही येऊं देऊं नये. मग पाहणें कोठील ?

मातोश्री व कुटुंब सहवर्तमान भाऊबरोबर हिंदुस्थानांत जाऊन स्वर्गंगा त्रिपथ भागीरथीचें स्नान त्रिस्थली यात्रा करावी, अंतःकरण शुद्धी होईल, या भावनें करून गेलों. त्या कालीं चित्तास अति वैराग्य. याचें कारण शरीरीं किंचित् पीडा. तेणेंकरून चित्त अति वैराग्यशील जहालें. की, एक भगवंताची पूजा व ध्यान मात्र करावें. उष्ण शीत यांचीही पीडा. परंतु चित्तास नाहीं. मातेचे ठायीं भक्ती होत्साता चाललों. ते नर्मदा महागंगेमध्यें स्नान करून एका वृत्तीनें ध्यान केलें. त्या दिवसापासून उत्तरोत्तर वैराग्य अंतःकरण-शुद्धीच होत चालली.

भाऊंची ममता विशेष व आंवेची व्यथा बहुत जाहाली. उठावयास शक्ति नाहीं. रेचन बहुत, ग्लानी फार तेव्हां कूच जहाले असतां मुक्काम श्रीमंतांनीं करवावा. त्याकालीं ईश्वरें आरोग्य केलें.

पुढें दर मजल चरमन्वतीतीरीं गेलों. तेथें ग्रहण पडलें. स्नान-दानादिकें करून आत्मा पवित्र होत्साता ध्यानें करून कालक्षेप चालत असें. पुढे सूर्यतनया यमुना

---

२. पिता–जनार्दन बल्लाळ भानु.

३. परंपरेनें कसा चालत आला तें वंशावळ पहिली असता समजेल. पेशवे-बखर, संपा. का. ना. साने, पृ. १९ पहा. खेरीज भानूंचा व पेशव्यांचा घरोबा किती हेंही पे. ब. पृ. ११–१९ पाहिली असता ध्यानात येईल.

४. ही स्वारी १७५५।५६ त झाली ती. पे. ब. पृ. ६० टी. ६ पहा.

५. पितामह–बाळाजी महादेव भानु.

६. मातामह पक्ष–बळवंतराव मेहेंदळे.

इचेतीरीं गौ-घाटा जवळ गेलों. तेथें स्नान संध्या करून दोहीं दिवसां नंतर मुक्तिपुरीं श्रीमथुराक्षेत्रीं[७] गेलो. तेथें क्षौर प्रायश्चित श्राद्धादिक करून तदनंतर पुढें भगवान् पूर्णब्रह्म राधाकृष्ण याणें सकल लीला केल्या असें जें वृंदावन त्या स्थळास गेलों. तेथें कालिया–डोहीं कदंबवृक्ष ज्याजवर भगवान् बसून वस्त्रहरण करिता जहाला, त्याच्या शाखा अद्यापि यमुनेंत गेल्या आहेत, त्या खालीं जाऊन स्नान तर्पण करून तदनंतर गोपीचंदनाचे टिळे व तुळशीच्या माळा घालून भगवंताचें ध्यान करीत होत्सात वृंदावनांत अटलविहारी व कुंजविहारी व बाळविहारी, राधाकिशोर, गोविंदजी या भगवंताच्या मूर्तां यांचीं दर्शनें घेतलीं. त्यांत कुंजविहारी मध्यानकालीं चोंपाळयावर निद्रिस्थ, कपाट लागलेलें, परंतु चोंपाळयाची दोरी बाहेर ओटीत असत, ती आपले हातीं ओढून भगवान् जो यास आंदोलन-लीला केली. तेथोन शृंगारवट जेथें भगवंतें राधेस श्रृंगार केले, तेथें जाऊन वट-दर्शन घेऊन पुढें वंशीवटी ह्मणजे जेथें भगवंतें मुरलीवादन केलें, तेथें जाऊन वटाचें दर्शन घेलें. तेथून सेवावन, कुंजवन हीं स्थळें, कुंज करें कीं भगवान् लीला करितो असाच भास होत असावा! सर्वही वृक्ष छत्राकार, ठेंगणे. भूमिस्थ पल्लव कंटक वृक्षासही, परंतु कंटक नाहीं! हें पाहून आनंदमय होत्साता यमुनातीरीं रेतींत भगवान् जो याणें बाळरूपीं लीला केली, पादारविंदसंबंधी रेणु रजःकण त्याची प्राप्ती मस्तकीं वंदावया करितां ब्रह्मादिक देव इच्छितात. तेथें जाऊन लोळून ती रेती मस्तकावर घेतली. तेथोन ज्ञानगुदडीस * गेलों. तेथें थोर थोर संत, महंत, बैरागी भगवत्पर होत्साते, सायंकाळचे साहा घटिका दिवसास येऊन बसून पुराण-श्रवण करीत आहेत. भगवंताच्या कथा नामें गाताहेत. त्यांचें दर्शन घेऊन चार घटिका पाहून चित्त बहुत शांत जहालें.

तदनंतर धीरसमीर जेयां प्रति कालिंदी-तीरीं जाऊन सायंकाल संध्या करून भगवान् सांबसदाशिव जो याचें एकाग्र मनें करून ध्यान करून येता जहालों. याप्रमाणें तीन चार दिवस क्रमिले.

अनेक जन्मांचें पुण्य कीं, असें वृंदावन दृष्टीस पडलें, तेणें करून भगवंताच्या मूर्तीं व भगवद्भक्त त्यांचे दर्शनें करून नेत्र पवित्र जाले. पादें करून चालत गेलों, तेणें करून पायांचें सार्थक जाहालें. हस्तें करून नमस्कार करिता जहालों तेणेंकरून हस्त पवित्र झाले. मुखें करून नामस्मरण केलें, तेणेंकरून मुख पवित्र झालें. कर्णें करून भगवत्कथा-श्रवण केलें तेणें करून श्रोत्र पवित्रता पावले. स्नानें करून सर्व देह पवित्र झाला.

---

७. ह्या सप्त मुक्तिपुऱ्या प्रसिद्ध आहेत :
अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका। पुरी द्वारावती चैव सप्तेता मोक्षदायका. * बैराग्यांचा आखाडा किंवा मठ.

ज्या वृंदावनांत वैरागी एकग्र वृत्ती करून ध्यानस्त होत्साते कुंजाखालीं जागां जागां बसले आहेत; कोणी पर्णेंच भक्षून, कोणी जल प्राशन मात्र करून, कोणी दुग्ध सेवन करून, कोणी सिद्धान्न आणून घालील तेंच खाऊन राहिलें आहेत; अशांचें दर्शन घेऊन सत्समागमाचें माहात्म्य किंचित् आनंदातें पावलों. त्यांत एका वैराग्यानें कृपा करून एक मंत्र भगवंताचे नामाचा सांगितला, कीं याचा जप करीत जावा. तो भगवंतेंच सांगितला असा मानून, सर्वांस यथाशक्ति देणें देऊन संतोषातें पावलों.

पुढें दिल्लीस गेलों. तेथें पृथ्वीपतीचें* दर्शन श्रीमंतांचे आज्ञेवरून घेतलें. त्यांणीं बहुत कृपायुक्त भाषण करून आशीर्वाद देऊन आपले जवळील वस्त्रें दिलीं. तीं घेतलीं. किंचित् संतोष जाहला कीं, भगवंताचे कृपेचे अंतर्वर्ती ही कृपा आहे!

तदनंतर श्रीमंतांचे लष्करांत श्रीमंतांजवळ आलों. बसलों असतां भूमीकंप जाहला. परंतु भगवंताचें ध्यान चित्तांत आणिता जालों. दिल्लींतील चित्रें वगैरे विषय, ज्यांत पाप नाहीं असेही घेतले. पाहिले. पुढें उत्तरेकडील यवन [८] शत्रुत्वें करून यमुना पैलतीरीं पाऊण लक्ष सेनेसहवर्तमान येऊन उतरला. परंतु यमुना भरपूर चालली, तेणेंकरून उभयपक्षीं स्तब्धताच जाहली.

पुढें कुंजरपुरा श्रीमंतांनीं शौर्यें करून घेतला. मीही युद्धांत होतों. ईश्वरें रक्षिलें. तां इत्कियांत यवन आलीकडे आला. श्रीमंत सैन्यासहवर्तमान त्याचे समोर गेले. गांठ पडली. तेव्हां मी तर लहान! श्रीमंताचे बुद्धीस, महानबुद्धी परंतु भावी अर्थ तेणेंकरून, विपर्यास पडला. आप्त होते बळवंतराव [९] मातुल व नाना पुरंधरे वगैरे ते अनाप्त झाले. जे अनाप्त शाहनवाजखानी, [१०] भवानी शंकर वगैरे ते आप्त जाहले, त्यांचे वाक्याचे ठायीं विश्वास, तेणेंकरून आपली रीत युद्धाची सोडून यवनाची रीत [११] धरिली. परस्परें युद्ध होत असे. गोळे प्रत्यहीं शत्रूचे राहुटीवरून जात. मातोश्री व स्त्री भयभीत होत, कीं कसें होईल? ते ते समयीं मातोश्रीस विनंती करीत गेलों, एक 'ईश्वरीं लक्ष असावें.' त्यांत मातुल [१२] युद्धांत होते ते पडले. ते दिवशींच सर्व सैन्य नाशास पावावें. परंतु

* पृथ्वीपति=बादशहा. जवानबख्त ह्मणून एक लहान शाहाजादा भाऊंनींच गादीवर बसविला होता.

८. यवनः अहमदशहा अबदाली हा या काळीं २४ दस्ते फौजेसह आला होता. सुमारे १२ शें. लोकांचा एक दस्ता.

९. बळवंतराव मातुल—हे बळवंतराव गणेश मेहंदळे

१०. हे दिल्लींतील पादशाही मुत्सद्दी—

११. एक जागां खंदक करून राहाणें ही रीति—ही यवनी रीत इभ्राइमखां गाडदी याचे मसलतीवर व बळावर पतकरली.

१२. मातुळ—बळवंतराव मेहंदळे. पुढें कुटुंब सती गेलें असें आहे तेव्हा हे मातुळ मेहंदळेच. भाऊसाहेबांची बखर संपा. साने पृ. ११४ १५–१६ पहा.

रात्र जाहली यामुळें राहिलें. त्या दोन महिन्यांत मनुष्य, पशु बहुत मेले. अन्नाची महर्गता. दुर्गंधी एकेच ठिकाणीं. असे श्रम पाहिले. पुढें मातुळाची स्त्री समागमें गेली. मातोश्रीस श्रम फार जाहले. होणार अवश्यक होतें. यदर्थी संदेह धरूंच नये, हा माझा निश्चय.

पुढें थोरलें युद्ध* उदयीक होणार. तां पूर्व दिवशीं संकेत कीं, पराजय आपला जाहला तरी शत्रूचे हातीं श्रीमंताचें कुटुंब व आपलें हातीं लागूं नये. आपणच नाश करवावा. आपण तर वांचत नाहीं असा सिद्धांत करून श्रीमंतांनीं याचीही योजना केली.

दुसरे दिवशीं तयार होऊन प्रातःकालचे दोन घटिका दिवसास युद्धास गोळा-गोळीचा प्रारंभ जाहला. श्रीमंत अति बुद्धिवान, धैर्यवान्, शूर, कृतकर्में, गर्व मात्र विशिष्ट, परंतु तर्तुद फारच सैन्याची वगैरें केली. शेवटी निशाणा जवळील तर्तुद एकी-कडे जाऊन शत्रूची मुख्य स्थानींच गांठ पडली. मी श्रीमंता सन्निध ईश्वरस्मरण किंचित् करून असें. तो विश्वासराव यांस गोळी लागली. पडले. ते हत्तीवर श्रीमंतांनीं घालून उभेच राहिले. तां पठाण पाय उतारा आंत येऊन मिसळले. तोडातोडी होऊं लागली. आणि डावे बाजूचे मातवर, चौघड्याचे धनी देखील, पूर्वींच पळाले. उजवे बाजूचे ही होळकर शिंदे निघोन निशाण निघालें. दोन तीन शत पायदळ होतें.

श्रीमंत दिसेनासे जहाले. तेव्हां ईश्वरें बुद्धीं दिली. माघारे फिरलों. पूर्वी युद्धांत बापूजीपंतीं बोध केला. माघारे फिरावें. त्यांस उत्तर केलें कीं, अशा समयीं श्रीमंतास सोडणें ठीक नाहीं. परंतु पुढें या प्रमाणें जहालें. लक्ष सैन्य त्यांत मोठे मोठे सरदार असतां एकही त्या समयीं श्रीमंतास आप्त न जहाला. बहुत दिवस अन्न भक्षिलें. कृपा पुत्रवत् केली. तितकें चांगला काळ होता तेव्हा केशास ढका लागल्यास प्राण देऊं अशा प्रतिज्ञा. परंतु ईश्वर घटित विपरीत काळ, त्यांत सोबती कोण होतो ? सर्व सुखाचे सोबती. भोजन आदरें करून करावें. वस्त्रें, जवाहीर, जागिरा घ्याव्या. निदानीं इतके असून ज्यांचे देहाचें ठिकाण कोणास ठाऊक नाहीं. सर्व वाताहत जहाले.

मी सायंकालचे दोन घटका दिवसास घोड्यावर पाणिपतांत आलों. त्या देशाचा मार्ग अगदीं ठाऊक नाहीं. तेथें परमेश्वरें वाट दाखवावयास पुरते रामजीपंत उभे होते. सांगूं लागले, घोडें वस्त्रें टाकून द्यावीं. त्या वरून सर्व टाकून शुद्ध लंगोटी लावून बसलों. रात्र जहाल्यावर चाललों. तां एका कोसांत तीनचार वेळ शरीरास हात लावून टोपीवाल्यांनीं झाडा घेतला. दर खेपेस समागमेंचे दाहाबीस तोडून टाकीत. त्यांत मी राहिलों. हे सत्ता ईश्वराची. परंतु बापूजीपंत;[१३] रामाजीपंत* रोधातच गेले.

---

* थोरलें युद्ध—पौष शुद्ध ८ शके १६८२ भाऊ बखर पृ. ११९ व पुढें.

१३. बापूजीपंत—हरिपंत फडके यांचे सर्वांत वडील बंधू.

* रामाजी अनंत दाभोळकर, उपनाम काळे, सिंद्याचा दिवाण.

अनुक्रमणिका

असे जातां दाहा बारा कोश पश्चिमेकडे गेलों. तों तेच शत्रु येऊन रामाजीपंत, बापूजीपंत वगैरे यांस जखमी भारीं केलें. पडले. मी एकटा राहिलों. तो गवतांत गेलों. ईश्वरें तृणें करून माझें रक्षण केलें. त्यांस मोहिनी घातली. सर्वांस मारिलें असतां मी जवळ असतां न मारिलें व गवत लांब असतां जाऊं दिलें. पुढें ते गेल्यावर जाऊं लागलों. तों पुढें दोन कोशांवर दुसरे मागती दृष्टीस पडले. तेव्हां मागती तृणांत जाऊन बसलों. तों जवळ येऊन काढूं लागले. ते समयीं ईश्वर त्यांतील एका वृद्धाचे मनांत संचार करितां जाहला, कीं कशास मारितां? मग गेले.

तदनंतर माझी शक्ति पानिपतावर बहुत क्षीण, आमविकारादिक विकारयुक्त, अन्न चालेना, असा मी त्याजवर दयासमुद्र सांबसदाशिव जो याणें कृपा करून शरीर अशक्त, ऊन पाहिलेंच नाहीं, व पादचारी अभ्यास नसतां सोळा सत्रा कोश अन्न उदका व्यतिरिक्त आलों. क्षुधा तिसरे प्रहरीं लागली. तेव्हां बोरीचा पाला सांपडला तो खाऊन पाहिला. तो तोंडांत जाईना. तसा सायंकाळीं एका ग्रामाबाहेर आलों, तों एका बैराग्यानें पीठ आणून दिलें. त्याची भाकर खादली. ती अमृत-प्रमाण लागली. नंतर निद्रा केली. प्रातःकालीं गंगा-सहस्रनाम म्हणत ईश्वर-स्मरण करीत चाललों. तों एका गांवामध्यें गेलों. तेथें एक साहुकार होता, त्यानें घरीं नेलें. भोजन, एक ब्राह्मण होता, व यशवंतराव चाबुकस्वाराकडील भेटला, त्याजकडून स्वयंपाक करवून भोजन केलें. तो शत्रूचे स्वार गांवांत आले, हें वर्तमान कळलें. तेव्हां साहुकार ह्मणाला कीं, आह्मी गाडी करून जयनगराकडे पावते करितों. गाडींत बसून चाललों. तों पाहिलें कीं हा फसवितो, असें बुद्धीस येऊन गाडी टाकून पाय उतराच होउन चाललों. बरोबर दोन तीन ब्राह्मण, दोन मराठी माणसें, याप्रमाणें दाहा बारा कोश गेलों असे सात दिवस पायीं चाललों. नित्य भोजनाचें साहित्य ईश्वर देववी. तेणें करून समागमचे मंडळी सुद्धां भक्षून रेवडी[१४] पावेतों आलों. तों लष्करचे पळे त्या वाटेनें गेले. त्यांस गांवांत बालोराव ह्मणून चौबे भाऊ असत. ते माझें नांव ऐकून पुसत, 'कसे आहेत? चेहरा कसा?' खुणा खाणा सर्व त्यांणीं पुसून घेतलें. मागाहून हे येतात हें जाणून मार्गावर नेहमीं पाहात बसत. आह्मी आलों तों त्यांणीं रेवडी बाहेर ओळखिलें. पुसूं लागले. नांव न सांगावें हा निश्चय, परंतु तो आंगींच नांव लावूं लागला. त्याचे बोलण्यांत वांकडी गोष्ट नाहीं. आह्मांस साहित्य करून द्यावें, उपकार करावा हें पाहिलें. तेव्हां नांव सांगितल्यावर आपले घरास मंडळी सुद्धां नेऊन उत्तम प्रकारें भोजनाचें साहित्य करून दिलें. भोजन केल्यावर वस्त्रें दिलीं.

---

१४. मूळांत 'रेवाऊ' असें सर्वत्र आहे परंतु तें मोडींतून बालबोध करणाराच्या नजर-चुकीमुळें पडलें असावें हें स्पष्ट आहे. रेवडी हें शहर दिल्लीच्या वाटेवर मुक्कामाची जागा आहे.

तदनंतर रामजी दास जोशी मातबर रेवडींत असे त्यास वर्तमान कळल्यावर त्याणें आपले घरीं नेऊन ठेविलें. सात दिवस भोजनास व उत्तम वस्त्रें दिलीं. पुढें आमचे मानस *दाग भरतपुरास जावयाचें. परंतु तो ह्मणे सोबत चांगली लावून गाडी करून देऊन पावतें करीन. त्यावर एक लग्न निघालें. त्या बरोबर गाडी करून देऊन बरोबर पेढे साहित्य करून दिलें. आह्मी निघालों तों वाटेंत कृष्णंभट वैद्य आले. त्यांणीं सांगितलें कीं, स्त्री बिरोजी बारावकर[१५] यांणीं संभाळून आणिली. ती जिगनीस नारोपंत गोखले यांचे घरीं आहे. तेथें त्या गृहस्थानें साहित्य वस्त्र पात्रांचें केलें. आह्मीं तेथें गेल्यावर भोजन क्षिरीचें घातलें. तेव्हां आनंद झाला. मग स्त्रीस एक गाडी दुसरी करून तेथून निघालों. तों दिगेस आलों. तेथें पुरुषोत्तम महादेव ( हिंगणे ) पाणिपताहून आले होते. ते बानवळे यांचे गुमास्त्याचे बिऱ्हाडास राहिले होते. त्यांस कळतांच त्यांणीं आपले बिऱ्हाडास नेलें. तेथें कुटुंब सुद्धां कमकसर महिनाभर होतों. क्षुधा फार लागत असे. त्यांणीं वस्त्रें वगैरे साहित्य भोजनाचें चांगलें केलें. तेथून मातोश्रीचा शोध फार केला. परंतु घरचा खिजमतगार बरोबर होता त्याणें सांगितलें कीं, घोड्यावरून पडून जखम लागून मेली.[१६] हेंच ठिकाण लागलें.

पुढें पालखी व घोडीं घेऊन ढवळापुरावरून ग्वाल्हेरीस सारें लष्कर पळून पार्वतीबाई, नाना पुरंधरे, मल्हारजी होळकर सारे होते तेथें आलों. अंतःकरणापासून होतें कीं श्रीकाशीस जाऊन नेहमीं वास करावा. प्रपंचांतील विषय–मात्रीं दुःख हें पुरतें समजलें. परंतु देहप्रारब्ध बळवंत. तेथें आलियावर सर्वांनीं निषेध केला. 'एकदां देशीं जावें. मातोश्रींचा विधी करावा, वगैरे कित्येक प्रकार काशींत गेल्यावर कसें होईल?' पाणिपत जालें तेव्हां काशीही कसी होते. असें चित्तांत येऊन लष्करा बरोबर येऊं लागलों.

पाणिपताचें वर्तमान श्रीमंत नाना साहेबांनीं ऐकून माझें स्मरण फार[१७] गुरूजींजवळ केलें कीं, त्याचें शरीर अशक्त, कसा निभाव होईल? परंतु ईश्वरकृपेनें व त्यांचे आशीर्वादें महत्संकटांतून पार पडलों. पुढें श्रीमंत नानासाहेब यांचे दर्शन बराणपुरावर जालें. पाहतां तों शरीर फार क्षीण जाहलें आहे, मर्जी बेतऱ्हा[१८] जाली आहे. बहुतांच्या अश्रू क्षणक्षणां जातात. परंतु मजवर सदयतेनें लोभेंकरून भाषण करून वर्तमान पुशिलें. सांगितलें. तीन चार दिवस बरोबर राहिलों. श्रीमंत गोपिकाबाई व नारायणराव

* मूळात 'दीक भरतपुरास' असें आहे.

१५. बारावकर–हा पार्वती बाईस आपल्याला घोड्यावर घेऊन तिचें प्राणरक्षक करणारा 'बारवेकर' असावा. नानांची आई व कुटुंब या युद्धांत भाऊंची पत्नी पार्वतीबाई या जवळच होती.

१६. 'गिलचे यांजकडे सांपडली' असें भा. सा. ब. प्र. १२८ येथें लिहिलें आहे.

१७. महादजी बल्लाळ करकरे गुरुजी

१८. बेतऱ्हा=बिघडलेली, तऱ्हेवाईक.

यांस देवी आल्या. करितां त्या सहवर्तमान नर्मदातीरीं राहिलों. परस्परें उभयतांचें* चित्तही ठीक नाहीं हें कळलें. काल-वैपरित्यें करून न घडावयाचें तें ही घडलें. तदनंतर या मर्जीत कसें होईल जाणून निरोप घेतला कीं टोंक्यास पुढें जातों. जावें म्हणून आज्ञा दिली.

टोंक्यास येऊन राहिलों. तों श्रीमंतही मागाहून तेथेंच आले. पुन्हा दर्शन घेतलें. मर्जी विकट असतां एक शालिग्राम मागितला तों बहुत कृपेकरून आज्ञा झाली कीं, क्षेत्रांतून पाहिजे तो घेणें. सीतारामचंद्र मूर्ती घेतली.

एक दिवस प्रदोष तेथें पडला. ते दिवशीं श्रीमंत थोरले राव [१९] यांचें श्राद्ध ह्मणून मला भोजनास बोलाविलें. मी विनंती सांगून पाठविली कीं, प्रदोष आहे. तत्रापि यावें म्हणूनच उत्तर जाहलें. यावरून स्वारी देवास जातेसमयीं गुरुजींकडून विचारविलें. तेव्हां आज्ञा जाली कीं, रावसाहेब यांचें श्राद्ध आहे याजकरितां जरूर जरूर यावें. त्या वरून गेलों. श्राद्धाचे ब्राह्मण [ यांचीं ] भोजनें जाहलियावर खासा भोजनास बसले. एकीकडे श्रीमंत माधवराव [ व ] एकीकडे मला बसविलें, आणि दुसरे [२०] स्त्रीकडून वाढविलें. तिला शिक्षा वाढावयाची दाखविली. अर्थात् मातोश्रीकडून लेंकरास वाढविलें.

नंतर श्रीमंतांस विनंती केली कीं, कांहीं दिवस गंगातीरीं राहून मन स्वस्थ करावें असें आहे. त्यावरून आज्ञा जहाली कीं, कांहीं दिवस राहावे.

श्रीमंत कूच करून पुण्यास गेले तों शरीर क्षीणच होतें. शेवटील समय, लवकर यावें ह्मणून पत्रें आलीं. त्यांचे अन्नाचें शरीर, समयीं जवळ असावें, याकरितां पुण्यास येऊं लागलों, तों पारनेरा आलीकडे वर्तमान ऐकिलें कीं, कैलासवास केला. श्रीमंत दादासाहेब यांचीं पत्रें आलीं कीं, जरूर यावें. पुढें पुण्यास आलों. श्रीमंतांस देवदेवेश्वर[२१] सन्निध कैलासवास जाहला. हें ऐकून श्रम जहाले. नंतर दादांहीं कृपायुक्त ममता केली.

पुढें श्रीमंत राजश्री माधवराव साहेब यांस साताऱ्यास पेशवाईचीं वस्त्रें द्यावयाकरितां घेऊन गेले. समागमें मलाच घेऊन गेले. राजद्वारी वस्त्रें घ्यावयास समागमें येणें म्हणून बहुत आग्रह केला. विनंती केली कीं, आम्हांस गरज काय? आमचे खावंद आपण! म्हणोन गेलों नाहीं. त्यावर श्रीमंतीं राजआज्ञा घेऊन [ ते ] पुण्यास यावयास निघाले. समागमेंच होतों. वाटेंत चालतां एक गाडदी शेतांतील कुणब्याचे बायकोवर

---

नानासाहेबांचे व गोपिकाबाई यांचें ? त्याच वर्षी नूतन सपत्नी झाल्यामुळें बाईचें मन रुष्ट झालें असावें.

१९. थोरले राव=बाजीराव बल्लाळ.

२०. ही नारोबानाईक वाखरे, पैठणकर, यांची कन्या. लग्न १७८२ मध्यें मार्गशीर्षांत झालें. नांव राधाबाई ठेविलें.

२१. देवदेवेश्वर-पर्वतीवरील महादेव.

बलात्कारें सर्वां देखतां जाऊन पडला. तो एका राउतानें भाल्यानें मारिला. तेव्हां कामाची दशा पाहिली !

नंतर श्रीमंत निरा उतरोन पलीकडे गेले. आम्हीं उद्यां उतरोन जाऊं म्हणोन शिरोळ गांवांत राहिलों. नदीस पूर आला याकरितां नावेंत बसलों. मध्य-धारेंत नांव आली ती प्रवाहीं पडली. नावाड्यांनीं सांगितलें कीं, आमचा उपाय नाहीं. तेव्हां पुढें खडक जवळ आला, फुटली ह्मणजे शेवटीलच पक्ष. तेव्हां ईश्वर-स्मरण केलें. तों दोन मनुष्यांनीं उड्या टाकून नाव ओढून काढिली. हें रक्षण क्षीराब्धिशयन महाविष्णु यार्णे केलें.

पुढें पुण्यास आलों. तों श्रीमंतांनीं कृपा करून यासमयीं कार्यांत मन घालावें हे आज्ञा केली. *

---

"हें पुण्यश्लोकाचें स्वानुभूत निजहस्तें लिखित प्रकरण चतुर पुरुषानीं संगृहित परम यत्नेंकरून संपादिलें. त्याची प्रति श्रीमंत राजश्री मोरोपंत तात्या १००० सहस्रबुद्धे यांचे प्रीतीस्तव केली, मिती आषाढ शुद्ध ५ मित्रवासर शके १७७१ सौम्यनाम संवत्सरे." शिवकिंकर गोपाळ महादेव भोगले मुक्काम पुणें.'

"हा अस्सल लेख श्रीमंत बाळाजी जनार्दन ऊर्फ नाना फडनवीस यांचे जातीबद्दल त्यांनीं स्वदस्तुरचा लिहिलेला आपले जन्मापासून तों श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे कैलासवासी होऊन त्यांचें चिरंजीव श्री. माधवराव बल्लाळ यांस पेशवाईचीं वस्त्रें मिळून त्यांनीं यांस कारभार करण्यास सांगितला तों पावेतों लिहिला आहे. यांत त्यांनीं आपलीं दोषास्पद कृत्येंही लिहिलीं आहेत. सबब या लेखास फारच योग्यता आहे. असो, हा लेख अस्सल कोठें असेल तो असो, परंतु नक्कल मोरोपंत तात्या सहस्रबुद्धे यांचे संग्रहीं होती तिची नक्कल श्री. कृपा-सागर राजश्री गोपाळ महादेव भोगले पुणेंकर वास्तव्य टांकें याणीं शके १७७१ सालीं केली. ती अस्सल प्रत राजमान्य राजश्री माधवराव सखाराम कुळकर्णी सोलेगांवकर याणीं प्रत घेण्याकरितां आणिली. ती त्यांचें बरोबर भागानगरास आली. ती संभाळून ठेवणेंविषयीं भोगले यांचें पत्र सोळेगांवकरांस आलेवरून प्रत पाहिली. वाचिली. संग्रहायोग्य दिसल्यावरून संग्रह केला असे. मि० आश्विन शुद्ध १ भृगुवासर शके १८०० बहुधान्यनाम संवत्सरे."

वामन बाळकृष्ण दीक्षित.

अनुक्रमणिका

# विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि महात्मा जोतीबा फुले

**द. न. गोखले**

१७ मार्च १९८२ या दिवशी विष्णुशास्त्र्यांच्या निर्वाणाला शंभर वर्षे पूर्ण झाली. म्हणजे चालू वर्ष हे त्यांच्या निर्वाणशताब्दीचे वर्ष होय. त्यानिमित्त त्यांचे आणि म. फुल्यांचे तौलनिक अवलोकन करणे उद्बोधक ठरेल. १८५० ते १८८२ हा विष्णुशास्त्र्यांचा काळ नि १८२७ ते १८९० हा म. फुल्यांचा काळ. अर्थात दोघे समकालीन होते. दोघांचा काही संघर्ष झाला आणि दोघांनी दोन भिन्न विचारप्रणालींचे प्रतिनिधित्व केले, हे सर्वश्रुत आहे, तेव्हा, या तौलनिक अवलोकनातून दोघांचे गुणावगुण, कार्य, विचार नि महात्मता या साऱ्यांवर काही प्रकाश पडावा, अशी अपेक्षा आहे.

तेजस्वी राष्ट्रवादाचे नि ज्वलंत देशाभिमानाचे आद्य पुरस्कर्ते म्हणून विष्णुशास्त्री ओळखले जातात. अनेकांनी त्यांच्यापासून स्फूर्ती घेतली. लो. टिळकांनी, म. गांधींनी, सुभाषचंद्रांनी, नेहरूंनी, स्वातंत्र्यवीर सावरकरांनी त्या स्फूर्तीला व्यापक रूप दिले आणि आपले राष्ट्र स्वतंत्र झाले.

म. फुले हे सामाजिक समतेचे महाराष्ट्रातलेच नव्हे, तर भारताचे पहिले प्रणेते. शूद्रातिशूद्रांना त्यांनी जाग आणली. दलितांचा ध्वज प्रथम त्यांनी उंच धरला. डॉ. आंबेडकरांनी त्यांना आपले एक स्फूर्तिस्थान मानले. आज त्यांनी पुरस्कारलेल्या सामाजिक समतेसाठी शेकडो दलित नि दलितेतर कार्यकर्ते उभा देश ढवळून काढीत आहेत. त्यांच्या स्वप्नांच्या दिशेने येती पन्नास-पाऊणशे वर्षे देशाची वाटचाल होत राहाणार आहे.

दोघेही महामानव. दोघेही युगपुरुष. त्यांच्या तौलनिक अवलोकनाला हात घालताना वाटते, कुठे ते नि कुठे आपण ! असे अवलोकन करावे का ? अवलोकनाच्या अनुषंगाने

अनुक्रमणिका



मूल्यमापन येणार, विभूतिपूजनही घडणार. तर ते योग्य होईल का? पण मीटरपट्टी लहान असली तरी हिमालयाचे माप घेण्यासाठी तिचा उपयोग होतो ना? हात लहान असले तरी अनंत परमेश्वराला ते नमस्कार करू शकतात ना? तेव्हा वाटते, की अल्प मतीप्रमाणे जेवढे होईल तेवढे करायला काय हरकत आहे? 'प्रांशुलभ्ये फले लोभात उद्बाहुरिव वामनः' असा कदाचित मी दिसेन. पण फळ हाताला आले तर ते अमृताचे असेल.

१८७७ साली, निबंधमालेच्या ३ ऱ्या भागातील ४४ व्या अंकात विष्णुशास्त्री नि म. फुले एका अर्थी समोरासमोर आले. त्या अंकात सत्यशोधक समाजाच्या रिपोर्टावर लिहिताना म. फुल्यांवर नि त्यांच्या 'गुलामगिरी' व 'ब्राह्मणांचे कसब' या दोन पुस्तकांवर विष्णुशास्त्र्यांनी चौफेर झोड उठवली. उपहास, उपरोध, न्यूनदर्शन, युक्तिवाद, तुच्छता वगैरे सर्व हत्यारांनिशी म. फुल्यांना त्यांनी जणू कायमचे नेस्तनाबूत करून टाकले. म. फुल्यांच्या भाषेबद्दल त्यांनी म्हटले की, "आमच्या देशभाषेचा टाकान् टाका या एका ग्रंथकाराच्या अकांडतांडवाने खिळखिळा होऊन गेला आहे." म. फुल्यांच्या व्युत्पत्तिज्ञानाविषयी त्यांनी लिहिले, की "आजपर्यंत पाणिनी, भट्टोजी वगैरे वैयाकरण आमच्या देशात झाले. युरोपात मोक्षमुल्लरादिकांनीही आम्हाकरिता व्याकरणे रचून इकडे पाठवून दिली, पण त्या सर्वांनी [जोतीरावांपुढे] निवळ झक मारली!" म. फुल्यांच्या इतिहासज्ञानाविषयी त्यांनी असा शेरा मारला, की "आमच्या शूद्र इतिहासकाराने...असा मासलेवाईक इतिहास लिहून ठेवला आहे की त्याला आधार म्हणून कोठेही सापडावयाचा नाही..." म. फुल्यांच्या इंग्रजनिष्ठेच्या वर्मावर त्यांनी नेमके बोट ठेवले आणि रेव्हेन्यू कमिशनर रीव्हज यांनी केलेल्या मदतीबद्दल आपल्या शाळेतील मुलांनी "शरीराचे चर्मी जोडे" करून त्यांच्या पायात घालावे, असे म. फुल्यांना कसे वाटत होते, नि म. फुल्यांनी "मिशनऱ्यांपासून अनुग्रह कसा घेतला असला पाहिजे, ते त्यांनी दर्शवून दिले. सत्यशोधक समाजाचे कार्य हडपसर ते भांबुरडे एवढ्या टीचभर परिसरातच पसरल्याचे सांगून त्या समाजाला त्यांनी अगदीच क्षुद्र लेखले.—आणि ब्राह्मणभटांनी शूद्रांवर दास्य लादले, त्यांच्यावर तीन हजार वर्षे जुलूम केला, वगैरे जे प्रतिपादन म. फुले करीत होते, त्याविषयी "ब्राह्मणांच्या जुलमाचा बाऊ" करण्यात अर्थ नाही, ब्राह्मण-शूद्र संबंधात दास्य, जुलूम हे शब्द 'दांडगाईनेच' लावता येतात. एवढाच त्रोटक युक्तिवाद केला.

विष्णुशास्त्र्यांनी केलेला हा चौफेर हल्ला सयुक्तिक होता का? हल्ल्याची एकेक जागा घेऊन प्रथम आपण तपास करू या आणि मागून त्याकडे विहंगम दृष्टीने बघू या.

म. फुले हे मराठीतले एक 'शैलीकार' आहेत, असे मत अलीकडे व्यक्त झालेले आहे. ते 'ग्रामीण साहित्याचे आद्य जनक' आहेत, किंबहुना 'आधुनिक मराठी साहित्याचे आद्य जनक' आहेत, अशीही मते पुढे आलेली आहेत. ही सर्व मते

विचारार्ह आहेत नि त्यांत काही तथ्यांशही आहे. पण म. फुल्यांच्या भाषेकडे तटस्थपणे बघितल्यास तीमध्ये ग्रामीण मराठी, पाद्र्यांचे मराठी, संस्कृतनिष्ठ मराठी नि इंग्रजी यांचे एक विचित्र मिश्रण झालेले आहे. तिची वाक्यरचना सैल आहे, हे मान्य करावे लागेल. निदान, ब्राह्मणी सुसंस्कृत वातावरणात वाढलेल्या नि सुश्लिष्ट सुबोध लेखनाचा आदर्श घरात कृष्णशास्त्र्यांच्या ठिकाणी नित्य बघणाऱ्या विष्णुशास्त्र्यांना ती आक्षेपार्ह वाटावी, हे स्वाभाविक म्हणावे लागेल.

म. फुल्यांच्या ज्या व्युत्पत्त्यांवर विष्णुशास्त्र्यांनी आक्षेप घेतला, त्यांपैकी काही खरोखरच सदोष आहेत नि हास्यास्पदही आहेत. उदाहरणार्थ, त्यांनी म्हटले की, मार्तंड हा पुरुष फार अभिमानी होता. तो शत्रूला पाठीकडून मारीत नसे, तर तोंडाकडूनच मारी. अर्थात तो 'मारतोंड' झाला नि त्याचा अपभ्रंश 'मार्तंड' बनला. 'नरसिंह' म्हणजे सिंहाची नार अथवा बायको. नृसिंहाला क्षत्रियांनी हे हीनतादर्शक नाव दिले होते. वामनाने जेव्हा बळीच्या सर्व 'अंगणांचे' सोने लुटले तेव्हा त्याचा अपभ्रंश 'शिलंगणाचे सोने लुटले' असा होऊन गेला. म. फुल्यांचे शिक्षण त्या काळाच्या मानाने कमी नव्हते. ते लोकहितवादी गोपाळराव देशमुखांच्या एवढेच शिकलेले होते. तरी पण त्यांची क्षत्रिय माळी ही जात नि ते ज्या सामाजिक स्तरात वावरत होते, त्या सामाजिक स्तराचा मागासलेपणा लक्षात घेऊन त्यांच्याकडून शास्त्रशुद्ध उपपत्तीची अपेक्षा करणे कदाचित योग्य होणार नाही. पण त्यांनी दिलेल्या अनेक व्युत्पत्त्या स्वैर होत्या, हे विष्णुशास्त्र्यांचे मतही खोडता येणार नाही.

म. फुल्यांनी जो इतिहास दिलेला होता, त्याचा मथितार्थ पुढीलप्रमाणे दिसतो : (१) भट ब्राह्मण हे परकीय देशातून येथे आले. (२) त्यांनी या देशातील लोकांना जिंकून त्यांच्यावर दास्य लादले. त्यांना शूद्र बनवले. (३) जातिभेद उत्पन्न करून या देशातील लोकांत त्यांनीं फूट पाडली आणि आपल्याशी जे निकराने लढले त्यांना त्यांनी अस्पृश्य केले. (४) गेली तीन हजार वर्षे ब्राह्मणांच्या गुलामगिरीत, जुलमात शूद्र जगत आहेत. (५) इंग्रजांनी शूद्रांना ब्राह्मणांच्या कैदखान्यातून मुक्त केले.

हा इतिहास केवळ विष्णुशास्त्र्यांनीच नव्हे तर अनेक विचारवंतांनी आक्षेपार्ह मानला आहे.

सुधारकाग्रणी आगरकरांना असे वाटत होते, की मनुष्यसमूहांच्या काही स्वाभाविक प्रवृत्तींमधून जातींचा उद्भव झाला. आपले मत "सामाजिक स्थिती आणि गती" (९-६-१८९०) या निबंधात मांडीत असता त्यांनी म्हटले, की 'रेवरंड जोतीबासारख्यांनी दुराग्रहामुळे किंवा अविचारामुळे हिंदुस्थानातील वर्णव्यवस्था अप्पलपोट्या ब्राह्मणांनी केली आहे, असे प्रतिपादिल्यास अशांच्या तोंडाला हात घालण्याची सोय नाही....' जातिभेदामुळे होणारे नुकसान आगरकरांना मान्य होते,तो दिवसेंदिवस क्षीण व्हावा, असेच प्रतिपादन ते करीत होते. पण "ब्रह्मयाच्या तोंडून ब्राह्मण उद्भवले, किंव

स्वार्थसाधू ' भटां 'नी कुणब्यांस अज्ञानात किंवा दास्यस्थितीत लोळत ठेविले, असले वेडगळपणाचे किंवा दुराग्रहाचे वरळणे मात्र आम्हास मान्य नाही. " असे ते ठासून सांगत होते.

' महात्मा फुले समग्र वाङ्मय ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशांनी म. फुल्यांच्या उपपत्तीवर अनेक गंभीर आक्षेप घेतले आहेत. त्यांच्या मते, मत्स्यापासून परशुरामापर्यंतच्या अवतारांचा जो अर्थ म. फुल्यांनी दिला आहे तो काल्पनिक आहे. भारतीय ब्राह्मणप्रधान विषम समाजरचनेला बाहेरून आलेले ऋग्वेदिक आर्य हे मूलतः कारण नाहीत, उलट, काही आधुनिक संस्कृतिशास्त्रज्ञांच्या लेखनावरून असे दिसते, की जातिभेद आर्यपूर्व संस्कृतीत दक्षिण भारतात उत्पन्न झाला. तो वैदिक आर्यांना स्वीकारावा लागला. मूळ संस्कृतीमधील पुरोहित-वर्ग हाच विद्यमान भारतातील बहुसंख्य ब्राह्मणवर्ग होय.

म. फुल्यांच्या विचारांचे प्रा. गं. बा. सरदार हे थोर भाष्यकार आहेत. म. फुल्यांच्या विचारांना त्यांनी सुव्यवस्थित नि नागर रूप देऊन खऱ्या ब्राह्मणाचे कार्य केलेले आहे. असे म्हणता येईल. त्यांनीही ' म. फुले : व्यक्तित्व आणि विचार ' या अलीकडच्या ग्रंथात म. फुल्यांच्या उत्पत्तीमधील एक मोठी उणीव दाखविली आहे. त्यांच्या मते, भारतीय समाजरचनेत ब्राह्मण नि क्षत्रिय या दोन वर्णांचे इतरांवर वर्चस्व होते. हे दोन वर्ण एकमेकांना सांभाळून घेत असत. ब्राह्मणांना राजसत्तेचे साहाय्य घ्यावे लागे. कारण त्यांनी दिलेल्या निर्णयांची अंमलबजावणी राजसत्तेवर अवलंबून असे. शिवाय, राजे लोक त्यांना जी इनामे, वर्षासने किंवा अग्रहार देत त्यावर त्यांची उपजीविका चालत असे. उलट, राजसत्तेला बळकटी आणण्याचे काम ब्राह्मण करीत. कारण राजा विष्णूचा अंश आहे, वगैरे विचार ते समाजात पसरवून देत. ' ब्रह्म वर्धयति क्षत्रं क्षत्रतो ब्रह्म वर्धते ' हे महाभारतातील वचन वस्तुस्थितीचे निदर्शक आहे. " त्यांनी ( जोतीरावांनी ) सामान्य कष्टकरी जनतेच्या शोषणाबद्दल एकट्या ब्राह्मणांनाच जबाबदार धरले क्षत्रियांची भूमिका नीट तपासली नाही. त्यांच्या विचारप्रणालीतील ही एक मोठी उणीव म्हटली पाहिजे." ( पृ. २९० ) प्रा. सरदारांनी हेही दाखवून दिले आहे की राम नि कृष्ण या क्षत्रिय अवतारांच्याबद्दल लिहिताना म. फुल्यांची पंचाईत झाली आहे. रामाने शंबूकाचा वध करून वर्णव्यवस्थेचे रक्षण केले आणि श्रीकृष्णाने ' चातुर्वर्ण्यं मया सृष्टम ' असे सांगून वर्णव्यवस्थेला ईश्वरी अधिष्ठान दिले. पण क्षत्रिय अवतारांच्या त्या कृत्यांचा उलगडा म. फुल्यांना नीट करता आलेला नाही.

मुख्य विधेय दृष्टीआड केले तर म. फुल्यांच्या लेखनात अनेक अनैतिहासिक विधाने दाखवून देता येतील. उदाहरणार्थ, खिस्ती मिशनऱ्यांना ते बळीराजाचे अनुयायी समजतात आणि बळी म्हणजेच खिस्त अशा अर्थाचीही मांडणी करतात. शंकराचार्यांनी अनेक तुर्कांना क्षत्रिय हिंदूत ' सरते ' करून घेतले व त्यांच्या मदतीने

तलवारीच्या बळावर बौद्धांचा पराभव केला, असे प्रतिपादन त्यांनी केले आहे. ( समग्र वाङ्मय, पृ. १२२–२३ ), पण या सगळ्याला आधार काय ते कळत नाही.

ब्राह्मण–शूद्र–संबंधाविषयी म. फुल्यांनी मांडलेल्या मुख्य विधेयकाचे साग्र नि साधार खंडन विष्णुशास्त्र्यांनी केलेले नाही. पण आगरकर, लक्ष्मणशास्त्री, सरदार वगैरेंची मते विचारात घेतल्यास नि एकंदरीत विचार केल्यास विष्णुशास्त्र्यांनी म. फुल्यांच्या इतिहासज्ञानावर जी टीका केली ती कठोर असली तरी निर्मूल म्हणता येणार नाही. डॉ. आंबेडकरांच्या ग्रंथात म. फुल्यांच्या काही कल्पनांना आधार सापडतो. पण तेवढ्या-वरून त्यांचे सगळे विधेय शास्त्रशुद्ध ठरत नाही.

विष्णुशास्त्र्यांच्या हल्ल्याची काही अंगे अशी एकेकशः तपासल्यावर त्या हल्ल्याकडे जर विहंगम दृष्टी टाकली तर असा प्रश्न उत्पन्न होतो, की म. फुल्यांच्या मुख्य विषया-कडे त्यांनी एवढे दुर्लक्ष का केले ? भट–ब्राह्मणांनी शूद्रांना जिंकले नि दास केले, त्यांच्यावर विषम समाजरचना लादली, नि तीन हजार वर्षे त्यांचा छळ केला, हे म. फुल्यांचे मुख्य विधेय होते. त्याला विष्णुशास्त्र्यांनी सरळ नि साग्र उत्तर का दिले नाही ? ही वादपद्धती योग्य होती का ? भाषा, व्युत्पत्ती, इतिहासज्ञान वगैरे गौण गोष्टींची खिल्ली उडवून मुख्य विषयाला बगल देणे हे धर्मयुद्ध होते का ? म. फुल्यांनी चिरंजीव परशुरामाला एक विक्षिप्त वाटावी अशी नोटीस दिली होती. तीवर विष्णु-शास्त्रींनी बोट ठेवले आहे. म. फुल्यांनी वृत्तपत्रांकडे पाठविलेल्या आपल्या एका पत्रातील 'ऱ्हस्वदीर्घाच्या चुका' स्नेह्याकरवी दुरुस्त करून घेतल्या होत्या. त्याकडे विष्णुशास्त्र्यांनी अंगुलीनिर्देश केला आहे. म. फुल्यांकडील 'शरीराचे चर्मी जोडे' इंग्रजांच्या पायावर चढणार, म्हणून विष्णुशास्त्र्यांनी त्यांचा कसा अधिक्षेप केला, ते यापूर्वी सांगितले आहे. अशा चिल्लर नि गौण गोष्टींचा व्यवस्थित समाचार घेऊन मुख्य गोष्ट डावलण्यात विष्णुशास्त्रींनी अन्याय केला, असेच प्रथमदर्शनी वाटले. 'दीनबंधू'-ने निबंधमालेतील लेखावर लिहिताना विष्णुशास्त्र्यांच्या या वादपद्धतीवरच आक्षेप घेतला होता. ( निबंधमाला, मा. ३, अंक ४८) त्याने म्हटले होते, "मालाकारांचा झोक चरचरीत लिहिण्याकडे असतो व दुसऱ्याचा पाणउतारा करण्याची ऐट असते... फुले यांनी जे लिहिले आहे, ते ते स्मृतिपुराणे यांचे प्रमाणांनी असत्य असे व्यक्त करून दाखविले असते तर त्यांची तारीफ करता आली असती"

विष्णुशास्त्र्यांनी गौण गोष्टींच्या आधारे म. फुल्यांची जी टर उडवली तिची अनेक कारणे संभवतात. 'गुलामगिरी'त नरसिंह अवतारावर लिहिताना म. फुल्यांनी विष्णु-शास्त्र्यांच्या वडिलांचा उद्धार केला होता. ( समग्र वाङ्मय, पृ. १०४ ). प्रत्यक्ष नाव न घेता 'रांडेने गुलाम केलेला प्रतिबृहस्पती' अशा अर्थाचे दूषण कृष्णशास्त्र्यांना त्यांनी दिले होते. कृष्णशास्त्री बाहेरख्याली होते ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. विष्णुशास्त्र्यांच्या बंधूंनी विष्णुशास्त्र्यांचे जे चरित्र लिहिले आहे, त्यात कृष्णशास्त्र्यांकडून 'बाहेरचालीची

काही आगळीक' घडल्यामुळे त्यांना ट्रान्स्लेटर एक्झिबिशनर या जागेवरून काही काळ निलंबित केले होते, असा उल्लेख आहे. (पृ. ८). म. फुल्यांनी प्रसंग नसताना कृष्णशास्त्र्यांचा हा जो उद्धार केला, त्यामुळे विष्णुशास्त्र्यांचा त्यांच्यावर दात होता, असे श्री. धनंजय कीरांनी म्हटले आहे. (महात्मा जोतीराव फुले, पृ. १७०). वडिलांचा दुर्गुण खरा असला तरी त्याचा उल्लेख विष्णुशास्त्र्यांना झोंबला असेल, हे पूर्ण संभवनीय आहे. पण 'निबंधमाला' वाचताना, याच उल्लेखावरून दात धरून म. फुल्यांच्या मुख्य विधेयाकडे त्यांनी दुर्लक्ष केले नि गौण गोष्टींच्या आधारे त्यांना हास्यास्पद बनवले, असे वाटत नाही. किंबहुना या उल्लेखाचा दंश त्यांच्या मनात असलाच तर कुठेतरी कोपऱ्यात सुप्त स्थितीत असावा, असा ग्रह होतो.

नावडत्या व्यक्तींवर नि गोष्टींवर शब्दप्रहार करण्याची विष्णुशास्त्र्यांना सवय होती. स्वामी दयानंद, रावसाहेब–रावबहादूर, ख्रिश्चन मिशनरी वगैरे विषयांवरील त्यांचे लेखन त्या सवयीची स्पष्ट साक्ष देते. 'दीनबंधू'च्या उपर्युक्त लेखात या सवयीचाच निर्देश आहे. तेव्हा, म. फुल्यांवर लिहिताना विष्णुशास्त्री आपल्या स्वभावावर गेले असे म्हणता येईल. मग शब्दप्रहार करण्याच्या धुंदीत म. फुल्यांच्या मुख्य विधेयकाकडे त्यांचे दुर्लक्ष झाले, अशी मीमांसा करता येईल.

पण या ठिकाणी हे लक्षात घ्यायला हवे, की शब्दप्रहार करण्याची सवय एकट्या विष्णुशास्त्र्यांना नव्हती. ती सवय तेवढ्याच प्रमाणात म. फुल्यांनाही होती. फरक एवढाच की एकाचे शब्द नागर असत, तर दुसऱ्यांचे गावरान असत. 'गुलामगिरी'त कृत्रिमी, दुष्ट, मतलबी, अनाचारी, गोमांस खाणारे वगैरे वाटेल ती विशेषणे म. फुल्यांनी भट-ब्राह्मणांना लावली आहेत. शंकराचार्यांना 'एक तऱ्हेची तरकट क्रिया जाणणारा महापंडित' म्हटले आहे. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, रामदास यांसारखे ब्राह्मण ग्रंथकार 'पायलीचे पंधरा आणि अधोलीचे सोळा' होऊन व्यर्थ 'वाया गेले' असा उल्लेख केला आहे (भाग १० वा). 'इशारा' या पुस्तिकेत न्यायमूर्ती रानड्यांना 'आर्य ब्राह्मणांतील पहिला दिवाभीत' आणि 'नूतन शंकराचार्य' अशा पदव्या बहाल केल्या आहेत. आणि कृष्णशास्त्र्यांची वासलात कशी लावली आहे, ते पुन्हा सांगण्याचे कारण नाही. विष्णुशास्त्री म्हणतात, की "श्रावणमासी जोतिबांच्या भगिनींचा (वार नामक) गालिप्रदानविधी जो मोठ्या थाटाने चालतो, त्याचा रस ज्यास चार घटका अनुभवावयाचा असेल, त्यास 'गुलामगिरी'सारखे साधन नाही." विष्णुशास्त्र्यांचे ते म्हणणे अगदी खरे आहे. (आणि विष्णुशास्त्री कसे संस्कृत गालिप्रदान करीत तेही त्या म्हणण्यावरून ध्यानात घेण्यासारखे आहे.)

'दीनबंधू'ने विष्णुशास्त्र्यांच्या चरचरीत लिहिण्यावर जेव्हा आक्षेप घेतला, तेव्हा असेही म्हटले होते की, "जेव्हा त्यांची हुक्की तारीफ करण्याकडे लागते तेव्हा ते त्या कलावर लिहितात." त्यामुळे शब्दप्रहार करण्याची विष्णुशास्त्र्यांची सवय मान्य

केली तरी म. फुल्यांवर लिहिताना त्यांना तारीफ करण्याची हुक्की का आली नाही, हा प्रश्न शिल्लक राहतोच.

विष्णुशास्त्र्यांनी 'आपल्या जातीच्या वतीने' म. फुल्यांवर हत्यार धरले, ते 'ब्राह्मणेतरांचे कडवे द्वेष्टे' होते. असे एक मत आहे (कीर पृ. १७०). तेव्हा, ब्राह्मणांचा अभिमान किंवा शूद्रांचा द्वेष त्यांच्या कृतीमागे कितपत होता, हे बघितले पाहिजे. म. फुल्यांनी भट-ब्राह्मणांच्या पदरात सर्व तऱ्हेचा दुष्टावा बांधला होता, आणि त्यातल्या त्यात परशुरामावर, पेशव्यांवर नि चित्पावनांवर धार धरली होती. त्याविषयी निबंधमालेच्या ३ ऱ्या भागातील ४८ व्या अंकात विष्णुशास्त्र्यांनी लिहिले : "चित्पावन हे चितेपासून जिवंत झालेले असोत किंवा इराणातून आलेले असोत, त्यांचे नैसर्गिक गुण जे यापूर्वी प्रकट झाले व अद्यापही होत आहेत, ते छप्पन्न 'गुलामगिऱ्यां'नी व शंभर 'जातिभेदसारां'नी लवमात्रही कमी होणारे नव्हेत. चित्पावनांनी गेल्या शतकात सारा हिंदुस्थान दणाणून देऊन आपल्या क्षत्रकुलांतक छत्रपतींप्रमाणे (परशुरामाप्रमाणे) दिग्विजय केला व अद्यापही त्यांचे बुद्धिवैभव जसेच्या तसे जागृत आहे...जोतीप्रभृतींनी कोल्हेकुई केली तरी ती सर्वच व्यर्थ होय." या लिखाणात विष्णुशास्त्र्यांचा ब्राह्मणत्वाचा नि विशेषतः चित्पावनपणाचा अभिमान उघड दिसतो. ब्राह्मण नि शूद्र या दोन पक्षांपेक्षा उंच भूमिका न घेता ते ब्राह्मण पक्षाची नि चित्पावनांची कड घेतात, हे निश्चित लक्षणीय आहे.

ब्राह्मणेतरांविषयी विष्णुशास्त्र्यांना 'द्वेष' होता, असे निखालस विधान करता येणार नाही. पण ब्राह्मणेतरांविषयी त्यांच्या मनात तुच्छताबुद्धी स्पष्ट दिसते. जेव्हा 'जोतिबांच्या भगिनींच्या गालिप्रदानविधी'चा ते उल्लेख करतात, म. फुले वगैरेंच्या टीकेला 'कोल्हेकुई' संबोधतात, किंवा म. फुल्यांना 'आमचे शूद्र धर्मसंस्थापक' 'शूद्र जगद्गुरु', 'शूद्र कवी' असे वारंवार म्हणतात, तेव्हा ती तुच्छताबुद्धी लपत नाही.

पण जातिविषयक भावनांचा मळ जसा विष्णुशास्त्र्यांना चिकटलेला आहे, तसाच तो म. फुल्यांनाही चिकटलेला आहे. हिंदुस्थानातल्या विषम समाजरचनेचे खापर एकट्या ब्राह्मणांवर त्यांनी कसे फोडले, तें यापूर्वी सांगितले आहे. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांसह सर्व ब्राह्मण ग्रंथकारांना त्यांनी कसे सरस्या भावात काढले, त्याचा निर्देशही पूर्वी येऊन गेला आहे. वास्तविक पाहता, ज्ञानेश्वरांच्या भागवत संप्रदायाने आध्यात्मिक क्षेत्रांत नि चंद्रभागेच्या वाळवंटात का होईना पण शूद्रांना समानता दिली होती, तेव्हा त्याविषयी म. फुल्यांनी थोडी तरी कृतज्ञता दाखवायला हवी होती. पण ज्ञानेश्वर ब्राह्मण असल्यामुळेच ते त्यांच्यावर बहुधा घसरले असावे. ब्राह्मणांवर त्यांचा एवढा राग होता की मृत्युपत्र करतानाही तो ते विसरू शकले नाहीत. "शूद्रादि अतिशूद्रांस दासानुदास मानणाऱ्या अग्रभटब्राह्मण जातीसह त्यांच्या अनुयायांचीमुद्दा माझे

शवावर व तत्संबंधी...विधीवर सावलीसुद्धा पडू देऊ नये." असे त्यांनी मृत्युपत्रात नोंदवून ठेवले आहे.* (कीर पृ. २५९). हा राग, हे जळणे सकारण असेल, अंशतः तसे होतेही, पण ते होते, हे आता खुलेपणाने स्वीकारले पाहिजे. मामा परमानंद हे सत्पुरुष म. फुल्यांचे कैवारी होते. त्यांनी म. फुल्यांसाठी सयाजीराव महाराज गायकवाडांकडे मदतीचे याचनापत्र पाठविताना त्यात लिहिले होते की, "जातिनिष्ठ किंवा चुकीची मते किंवा त्रासदायक भाषा" याविषयी सहानुभूती न वाळगताही त्यांना मदत करता येईल. (तत्रैव, पृ. ३०२). यातील 'जातिनिष्ठ मते' नि 'त्रासदायक भाषा' हे शब्द ब्राह्मणद्वेषाचे द्योतक होते, असे म्हणता येईल.

म. फुल्यांचे अनेक मित्र नि साह्यकर्ते ब्राह्मण होते. सदाशिवराव गोवंडे, सखाराम यशवंत परांजपे, मोरो विठ्ठल वाळवेकर वगैरेंची नावे त्यासंबंधात आठवण्यासारखी आहेत. त्यावरून म. फुले 'ब्राह्मणांचे' द्वेष्टे नव्हते, 'ब्राह्मण्याचे' होते, असे म्हणता येते; पण त्या म्हणण्यात विशेष जोर नाही. व्यक्तिशः काही ब्राह्मण त्यांचे मित्र नि साह्यकर्ते असले तरी ब्राह्मण या जातीविषयी त्यांना निश्चितच अप्रेम होते. नाहीतर ज्ञानेश्वरांची वासलात सहजतेने त्यांनी लावली नसती, आणि पेशव्यांपेक्षा मुसलमानांना जवळचे मानले नसते.

सारांश, विष्णुशास्त्री नि म. फुले या दोघांच्या मनात ज्या जातिविषयक तीव्र भावना होत्या त्या उभयतांमधील वादात अंतर्भूत असल्या पाहिजेत. मात्र, विष्णुशास्त्र्यांनी म. फुल्यांच्यावर जो विषम हल्ला चढवला त्यामागे तेवढेच कारण असू शकणार नाही. कारण तसाच हल्ला त्यांनी स्वामी दयानंदांवर नि लोकहितवादींवरही चढवला होता आणि ते दोघे तर ब्राह्मण होते.

मला वाटते, की विष्णुशास्त्री नि म. फुले यांच्यातील वादाचा नीट उलगडा व्हावयाचा असेल तर त्यासाठी विष्णुशास्त्र्यांच्या सर्व प्रयत्नांचे आदिरहस्य जाणून घेतले पाहिजे. देशाचा प्रखर अभिमान हेच ते आदिरहस्य होय. 'देशोन्नती' या केसरीतील शेवटच्या लेखात ते आदिरहस्य त्यांनी स्वतःच प्रकट केले आहे. देशाची उत्तम स्थिती कोणती ते सांगताना ते म्हणतातः

"...उत्तम स्थितीचे पहिले लक्षण देशाभिमान होय...घन पदार्थात जसे दाढर्य आढळते, म्हणजे त्यातील परमाणू अगदी परस्परसंलग्न असतात. त्याप्रमाणे राष्ट्राराष्ट्रातील लोकसमुदाय...अभिमानाच्या योगाने जितका एकत्र जखडला गेला असेल तितकी त्याची उन्नतावस्था समजली पाहिजे." म्हणजे त्यांना सर्वप्रथम देशाभिमान हवा होता आणि त्या अभिमानातून देशाचे दाढर्य वाढायला पाहिजे होते.

---

* हे विधी नकोतच असे फुले यांनी म्हटलेले नाही, हे लक्षात घेण्यासारखे आहे. ते धैर्य फुल्यांच्यापूर्वी ३० वर्षे अगोदर विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनी दाखविले होते.–**संपादक**

त्यांच्या सर्व प्रयत्नांचे हे आदिरहस्य ध्यानात घेतले, की सर्व नव्या धर्मपंथांवर किंवा पारमार्थिक संप्रदायांवर त्यांनी टीका का केली ते स्पष्ट होते. हे संप्रदाय स्वाभिमानातून नव्हे तर एक तऱ्हेच्या न्यूनगंडातून निर्माण झाले होते. ज्या अर्थी इंग्रजांनी सारा देश जिंकला त्या अर्थी त्यांचा धर्म नि त्यांची संस्कृती ही सर्व बाबतीत श्रेष्ठ असली पाहिजेत, असे ग्रहीत त्यांच्या स्थापनेमागे दडलेले होते. हिंदू धर्मातील खरेखोटे दोष दूर करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. त्यांचे पोषण अंगभूत प्राणशक्तीने होत नव्हते, तर अनुकरणातून होत होते. मूर्तिपूजेला विरोध कर, सामुदायिक प्रार्थना म्हण, खिस्ती विधी इकडे आण, हिंदूंच्या भल्याबुऱ्या गोष्टींना नावे ठेव, ही त्यांची धडपड त्यांच्यात स्वाभिमानाची वाण आहे, असे विष्णूशास्त्र्यांना दर्शवीत होती. दुसरे असे की, मुळात ठिसूळ असणाऱ्या भारतीय समाजात हे संप्रदाय पारमार्थिक कारणांनी उगाच फूट पाडीत होते. हिंदू परंपरेत जो काही उदारपणा नि लवचिकपणा होता त्याचा लाभ घेऊन नि भारतीय समाजातच मिसळून राहू कोणी काही सुधारणा केल्या असल्या तर त्यांच्यांवर विष्णुशास्त्र्यांनी एवढी टीका केली नसती. पण हे संप्रदाय हिंदू समाज फोडून त्यातील एक भाग खिस्त्यांकडे नेत होते. अर्थात देशाभिमान नि देशाचे दार्ढ्य यांच्या मुळावरच ते येत असल्यामुळे विष्णुशास्त्र्यांनी त्यांना विरोध केला. या संप्रदायांवरील त्यांची टीका पारमार्थिक किंवा धार्मिक ( रिलिजिअस ) कारणांनी होत नव्हती, तर ऐहिक नि व्यावहारिक कारणांनी होत होती. ऐहिक राष्ट्रवाद हा तिचा पाया होता. "आमच्या देशात...लोकांस अभिमानास चढवावयाची बाजू कोणती?—तर यज्ञोपवीत, गोब्राह्मण इत्यादी. स्वातंत्र्य, जन्मभूमी या शब्दांत वरच्या ( देशांसारखा प्रभाव प्राच्य देशात थोडाच आढळतो!"—असे जे विषादाचे उद्गार 'देशोन्नती' या निबंधात त्यांनी काढले आहेत, ते त्यांच्या ऐहिक राष्ट्रवादाची साक्ष देतात.

आर्यसमाज जर वेदांना प्रमाण मानीत होता नि या देशातील वैदिक परंपरा बळकट करीत होता, तर ब्राम्हो समाज किंवा प्रार्थना समाज यांना लागू पडणारी टीका आर्यसमाजालाही कशी लागू पडेल, अशी शंका या ठिकाणी येऊ शकेल. पण विष्णुशास्त्र्यांनी आर्यसमाजावर किंवा स्वामी दयानंदांवर का टीका केली ते तत्कालीन परिस्थितीच्या निरीक्षणावरून स्पष्ट होईल. स्वामी दयानंद वेद वगळता बाकीच्या हिंदू परंपरा, रूढी नि संप्रदाय यांच्यावर भडिमार करीत होते आणि त्यांच्याकडून तो भडिमार परस्पर व्हावा, म्हणून पुण्या-मुंबईचे प्रार्थनासमाजी त्यांचा उदोउदो करीत होते. मिळून आर्यसमाजाचा तत्कालीन परिणाम तरी हिंदूंच्या मनात चलबिचल नि अपराधीपणा उत्पन्न करण्यात होत होता. अर्थात, बुद्धिभेद थांबवण्यासाठी नि राष्ट्रीय दार्ढ्य टिकवण्यासाठी विष्णुशास्त्र्यांना स्वामी दयानंदांवर नि पर्यायाने आर्यसमाजावर घसरावे, हे स्वाभाविक होते.

म. फुले नि त्यांचा सत्यशोधक समाज यांच्यावर विष्णुशास्त्र्यांनी जे शस्त्र धरले

अनुक्रमणिका

ते त्यांच्या दृष्टीने त्यांच्या भूमिकेशी अत्यन्त सुसंगत होते. निबंधमालेच्या ३ ऱ्या भागातील ४८ व्या अंकात जेव्हा म. फुल्यांकडे ते पुन्हा वळले तेव्हा सत्यशोधक समाजामुळे उगाच वितुष्ट वाढेल हे त्यांनी वारंवार स्पष्ट केले आहे. त्या समाजात जे खिस्त्यांचे अनुकरण होत होते, मिशनऱ्यांशी जी लगट केली जात होती, तीवरही त्यांनी बोट ठेवले आहे. ते म्हणतात, की "...मत्स्य व कच्छ इराणातून आले वगैरे निवळ गप्पा खऱ्या मानून विनाकारणे बखेडा माजविणे हा किती मूर्खपणा आहे! आमच्या शूद्र देशहितेच्छूने...आपल्या ज्ञातीच्या सुधारणेचा जर समंजसपणे उद्योग केला तर त्यात व त्याचे, त्याच्या ज्ञातीचे व एकंदर देशाचेही कल्याण होणार आहे." ते आणखी लिहितात की, "आमचे सत्यसमाजवाले देशबंधू जर...या आर्यभूमीचा आजपर्यंत साऱ्या ज्ञातींना जसा अभिमान वाळगिला तसाच पुढेही वाळगून आपसा-आपसात वितुष्ट वाढू न देण्याची जर तजवीज ठेवतील, तर अजूनही आमची स्थिती सुधारेल." म. फुल्यांनी देशाभिमान सोडला, ते परधार्जिणे झाले, राजनिष्ठ बनले, हे विष्णुशास्त्र्यांनी पुढीलसारख्या वाक्यांनी व्यक्त केले, "इंग्रज सरकारची केवढी अपार राजभक्ती! वा!"..."जोतीबांनी कोणी महासमर्थ मिशनरींच्या पासून चांगला अनुग्रह घेतला असेल." बळीराजाचे अनुयायी मिशनरी. त्यांचे अनुयायी...आमचे जोतीबोवा. त्यांनी तर मिशनरींवर व बळीवरही ताण करून दिली आहे." त्यांच्या 'गुलामगिरी'त मिशनऱ्यांच्या "ज्ञानातील ...तत्त्वज्ञानाचा...अर्क..." आढळेल.

म. फुल्यांच्या उद्योगामुळे भारतीय समाजाचा देशाभिमान उतरेल, त्या समाजात फूट पडेल, ही विष्णुशास्त्र्यांची भीती अगदीच निराधार नव्हती. म. फुल्यांचे प्रयत्न सद्हेतुप्रेरित असले तरी त्यांतून हिंदुस्थानावर पारतंत्र्य लादणाऱ्या इंग्रजांविषयी आपल्याच काही देशबांधवांपेक्षा अधिक आत्मीयता वाटावी, अशी परिस्थिती उत्पन्न होणार होती. 'गुलामगिरी'त म. फुले म्हणतात, "इंग्रज लोक आज आहेत, उद्या नाहीत. ते आपल्या जन्मास पुरवतील म्हणोन कोणाच्याने खास करून सांगवत नाही. यास्तव या लोकांचे राज्य या देशात आहे तोच आपण सर्व शूद्रांनी जलदी करून भटांच्या वडिलोपार्जित दास्यत्वापासून मुक्त व्हावे, यांमध्ये मोठा शहाणपणा आहे." (समग्र वाङ्मय, पृ. १३६) म्हणजे एकीकडे शूद्र व इंग्रज आणि दुसरीकडे भट-ब्राह्मण अशी विभागणी ते करीत होते. इंग्रजी राज्याचे छुपे प्रसारक जे खिस्ती मिशनरी ते तर त्यांना आपले लिबरेटर किंवा बंधविमोचक वाटत होते. ते लिहितात, की "इंग्रजबहादराचा बाहुटा चहूकडे फडकू लागला, तेव्हा,...बळीराजाचे मतानुयायी अमेरिकन व एकाच उपदेशकांनी...त्या सर्वांचा एकंदर सर्व कृत्रिमी दुष्ट ब्राह्मणांस आधार दाखवून...कित्येक शूद्रांस ब्राह्मणांच्या कपटरूप दास्यापासून मुक्त" केले. (समग्र वाङ्मय, पृ. १२३).

म. फुल्यांचे विचारविश्व केवळ शूद्रांच्या कळवळ्याने आणि त्यांच्यावरील अन्याया-

संबंधीच्या संतापाने भरून गेलेले होते. त्यामुळे इंग्रज नि ख्रिस्ती मिशनरी हे तर त्यांना जवळचे वाटलेच, पण राष्ट्रीय स्वातंत्र्यांच्या प्रयत्नांनाही त्यांनी विरोध केला. इंग्रजी राज्याशी निष्ठा ठेवणे हे त्यांच्या विचारविश्वातील एक महत्त्वाचे मूल्य झाले. १८५७ च्या स्वातंत्र्य-समराविषयी त्यांनी पुढील उद्‌गार काढलेले आहेत, "देवाजीने एकदा शूद्रांवर दया करून इंग्रज बाहादराच्या हातून भटनानाचे बंड मोडविले म्हणोन बरे जाले. नाही तर... भटांनी आजपावेतो कित्येक महारांस एकेरी धोतर नेसल्यामुळे अथवा कीर्तनामध्ये संस्कृत श्लोकांचा उच्चार केल्यामुळे काळे पाणी दाखविले असते." शिंदे-होळकरांनी इंग्रजांना मदत केली म्हणून म. फुल्यांनी त्यांना शाबासकी दिली आहे. (समग्र वाङ्मय, पृ. १३६, १२४). म. फुल्यांची राजनिष्ठा नुसती इतिहास-विवेचनात मर्यादित झालेली नव्हती, तर नित्य व्यवहारातही ती उतरलेली होती. सत्य-शोधक समाजाच्या घटनेत म्हटले आहे की "या समाजात राजकीय विषयावर बोलणे अजी वर्ज आहे" (विष्णु कृष्ण चिपळूणकर, द्विविध दर्शन, माडखोलकर—वनहट्टी, पृ. ९२). आपला दत्तक पुत्र यशवंत याला मृत्युपत्रातदेखील म. फुल्यांनी राज-निष्ठेचा उपदेश केलेला होता. "आपणास तारणाऱ्या इंग्रज सरकारच्या हरएक कामी उपयोगी पडण्याकरिता आपल्या जीवाकडे पाहू नये." असे यशवंताला त्यांचे सांगणे होते. (कीर, पृ. २५९)

राष्ट्रीय स्वाभिमान नि देशाचे दार्ढ्य यांना महत्त्व देणारे विष्णुशास्त्र्यांचे विचार आणि शूद्रांचे दास्यविमोचन नि परकीयांविषयी राजनिष्ठा यांना महत्त्व देणारे म. फुल्यांचे विचार यांचे कोटेही जमण्यासारखे नव्हते. ते परस्परांशी विसंगत होते नि परस्परविरोधीही होते. त्यांचा संघर्ष अटळ होता. म. फुले इंग्रजांच्या म्हणजेच शत्रूच्या गोटाला जाऊन मिळाले आहेत, अशीच विष्णुशास्त्र्यांची भावना दिसते. तेव्हा म. फुल्यांचे विचार हास्यापद करून सोडायचे, त्यांच्या युक्तिकृतींना हिणवायचे, त्यांना तुच्छ लेखायचे, ही विष्णुशास्त्र्यांनी आपल्या प्रयत्नांची दिशा ठरवली. म. फुल्यांनी स्वतःच्या कल्पनेप्रमाणे इतिहासाचा काही अर्थ लावला असेल नि ब्राह्मणशूद्रांसंबंधी काही विचार मांडला असेल, पण त्याच्याशी विष्णुशास्त्र्यांना कर्तव्य नव्हते. फुल्यांचे प्रतिपादन युक्तिवादपूर्वक खोडून काढण्यापेक्षा त्यांची परधार्जिणी, फुटीर वृत्ती त्यांना निर्मूल करावयाची होती अर्थात, म. फुल्यांच्या प्रतिपादनाला चार–दोन फटकाऱ्यांनी बगल देऊन त्यांनी उपहास–उपरोध–आदिक सर्व साधनांनिशी त्यांची जमेल तेवढी हुर्यो उडवली.

विष्णुशास्त्र्यांनी म. फुल्यांना असा विरोध केला.–आणि 'पुनरुज्जीवनवादी' हा शिक्का तर गेली शंभर वर्षे त्यांच्यावर बसला आहे. पण परंपरागत समाज जसा होता तसाच त्यांना हवा होता, ते वर्णव्यवस्थेचे किंवा जातिभेदाचे पुरस्कर्ते होते, असे म्हणता येणार नाही. निबंधमालेच्या ३ ऱ्या भागातील ४८ व्या अंकात त्यांनी ब्राह्मण-शूद्र–


अनुक्रमणिका

वादातील आपली भूमिका स्पष्ट केली आहे. ते म्हणतात, " आमच्या ज्ञातीचे जे काही वास्तविक दोष असतील ते सर्व आम्हाला कबूल आहेत, त्यावर पांघरूण घालण्याची किंवा ते नाहीत, असे म्हणण्याची आमची बिलकुल इच्छा नाही. त्याचप्रमाणे आमचे शूद्र देशबंधूवर जातिभेदाच्या संबंधाने वगैरे जी दुःखे खरोखर येत असतील ती हलकी करणे आम्हांस मान्य आहे, व आमची पक्की खात्री आहे की, या कामास आमच्या ज्ञातिबांधवांची विमुखता दृष्टीस पडणार नाही, इतकेच नव्हे, तर ( ते ) पुष्कळ मोठ्या उत्साहाने त्यास साह्यही करतील." म्हणजे म. फुल्यांप्रमाणे शूद्रांच्या अन्याय-निवारणाला राष्ट्रीय स्वातंत्र्यापेक्षा किंवा राष्ट्रीय स्वातंत्र्याएवढे महत्त्व ते देत नव्हते. पण ब्राह्मणांचे दोष दूर व्हावेत, नि शूद्रांवरील अन्याय नाहीसा व्हावा, अशीच त्यांची भूमिका होती.

'देशोन्नती' या लेखात त्यांची भूमिका अधिक स्पष्ट होते आणि जातिभेदाविषयी त्यांचे विचार बऱ्याच प्रमाणात आपल्याला समजतात. तेथे जन्मभूमीचा अभिमान शिथिल होण्याची दोन कारणे त्यांनी दिली आहेत : १. राष्ट्राचे विस्तीर्णत्व, आणि २. जातिभेद. मग जातिभेदासंबंधी ते म्हणतात, की "याने तर या राष्ट्राची फूट अति-शयितच पाडली आहे. अठरा पगड जातीस अठरा टोपकारांनी गुंडाळून टाकले व साऱ्यांच्या हाती सारखीच करवंटी दिली, पण लोकांचे डोळे अजून उघडत नाहीत." प्रखर स्वाभिमानी राष्ट्रवादानेच विष्णुशास्त्र्यांना जातिभेदाच्या विरोधात उभे केले होते आणि सामाजिक समतेकडे ओढून नेले होते, हे लक्षात घेण्यासारखे आहे. ( तीच गोष्ट पुढे लोकमान्य टिळक नि स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या बाबतीतही घडली.)

राष्ट्रवादी विष्णुशास्त्री जर सामाजिक समतेला अनुकूल होते, तर समतावादी म. फुल्यांची राष्ट्रीय स्वातंत्र्याबाबत भूमिका काय होती? ईश्वरी संकेताने इंग्रज या देशात आले, त्यांनी शूद्रांना ब्राह्मणांच्या दास्यातून सोडविले, त्यांच्या अमलाखालीच शूद्रांची प्रगती होऊ शकेल; ही म. फुल्यांची विचारप्रणाली होती. त्या विचारप्रणालीत राष्ट्रीय स्वातंत्र्याला स्वभावतःच काही स्थान नव्हते. इंग्रजांचा अंमल जर शूद्रांच्या विकासाला आवश्यक धरला तर राष्ट्रीय स्वातंत्र्याची गरज उरत नाही, हे उघड आहे. मात्र या देशातील शूद्रांच्या विकासाचा विचार करून तेथेच म. फुले थांबले नव्हते. देशांतर्गत सामाजिक समतेवरून त्यांची उडी थेट मानवतावाद नि विश्वकुटुंब या उच्च ध्येयावर जाऊन पडली होती. 'गुलामगिरी' पेक्षा 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकात त्यांच्या मानवतावादाचा चांगला प्रत्यय येतो.

वास्तविक पाहता, सामाजिक समता, मानवी हक्क, मानवतावाद, विश्वबंधुत्व यांचा पुरस्कार करणारी विचारप्रणाली राष्ट्रीय स्वातंत्र्याखेरीज अपूर्ण राहते. जर समाजा-समाजात समता हवी, ब्राम्हण-शूद्रांत हवी, तर ती इंग्रज नि हिंदी लोक यांच्यात नको, असे कसे म्हणता येईल? त्यांच्यापैकी एक शास्ता नि दुसरा शासित, एक

शोषक नि दुसरा शोषित राहूच शकत नाही. ती समतेची नि बंधुतेची थट्टा होईल. पण म. फुल्यांच्या विचारशृंखलेमधला हा दुवा हरवला होता. शूद्रांचा कळवळा नि त्यांच्या प्रगतीचा निदिध्यास यांनी म. फुल्यांचे मन पूर्ण व्यग्र असल्यामुळे हे घडले असावे. कदाचित इंग्रज नि खिस्ती मिशनरी यांच्या युतीने जी देशांतर्गत शांतता नि समता प्रस्थापित केली, जो ज्ञानप्रसार केला, त्यामुळे त्यांची दिशाभूल झाली असावी. पूर्ण देशाला इंग्लंडच्या बरोबरीने जी समता मिळायला हवी होती, तिच्याकडे त्यांचे लक्ष गेले नाही. " जोतिराव फुले यांना ब्रिटिशांचे राजकारण व खिस्ती मिशनऱ्यांचा कावा समजला नाही. " हे आचार्य जावडेकरांचे म्हणणे खरे आहे. ( आधुनिक भारत, आ. ३ री, पृ. १०२ )

मात्र राष्ट्रीय स्वातंत्र्याचे महत्त्व न कळल्याबद्दल म. फुल्यांना विशेष दोष देता येत नाही. कारण, राजा राममोहन रॉय नि लोकहितवादी यांच्यापासून थेट न्यायमूर्ती रानडे नि नामदार गोखले यांच्यापर्यंत अनेक मंडळी इंग्रजांचा व हिंदुस्थानचा संबंध हिंदुस्थानच्या कल्याणासाठी परमेश्वरी संकेतानेच जोडला गेला असे तत्त्वज्ञान मानीत होती आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याकडे कमीजास्त प्रमाणात दुर्लक्ष करीत होती.

विष्णुशास्त्री नि म. फुले यांच्या विचारप्रणाली परस्परविरोधी होत्या. पण दोघांनीही विचाराप्रमाणे आचार ठेवला आणि असामान्य कर्तृत्व गाजवले. विष्णुशास्त्र्यांनी आपल्या विचारांना अनुसरून सुखाच्या सरकारी नोकरीवर लाथ मारली. सतत आठ वर्षे निबंधमालेचा प्रचंड डोलारा एकट्याच्या शिरावर वागवला आणि जगाच्या वाङ्मयीन इतिहासात एक अद्‌भुत घडवले. स्वाभिमानी राष्ट्रीय विचारांच्या प्रसारासाठी त्यांनी शाळा काढली. मागोमाग केसरी नि मराठा या दोन वृत्तपत्रांच्या प्रस्थापनेत पुढाकार घेतला. ही वृत्तपत्रे अशी की, वृत्तपत्रीय जगात ज्यांनी इतिहास घडवला ! काव्येतिहाससंग्रह, किताबखाना, चित्रशाळा वगैरे स्वावलंबी नि ध्येयपूरक उद्योग त्यांनी एकामागोमाग एक झपाट्याने सुरू केले. अवघ्या बत्तीस वर्षांच्या तोकड्या आयुष्यात हा पसारा त्यांनी हा हा म्हणता उभा केला. आणि साऱ्या व्यापांतून त्यागी, कृतिशील, स्वाभिमानी राष्ट्रभक्तीची अशी चूड पेटवली की जी कधी विझलीच नाही ! तिने पारतंत्र्यच पार भस्मसात केले !

आणि म. फुल्यांनी स्वतःच्या विचारांशी प्रामाणिक राहून त्या रुढीग्रस्त जुन्या काळात, साध्या शाळा नव्हे तर मुलींसाठी नि महारामांगांसाठी शाळा काढल्या. वडिलांनी घर सोडायला लावले, समाजाने पत्नीचा छळ केला, पण त्याला त्यांनी धीरोदात्तपणे तोंड दिले. न दमता ' बालहत्याप्रतिबंधक गृह ' काढले आणि ब्राह्मण विधवांच्या प्रसूतीची सोय करून एक लोकविलक्षण धाडसी पाऊल टाकले. सारा सनातनी समाज गदगदा हलवला. अस्पृश्यांसाठी घराजवळचा स्वतःचा हौद खुला करायला त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. शूद्रातिशूद्र, गोरगरीब, शेतकरी, गिरणीमजूर

अनुक्रमणिका

या साऱ्या दलितांच्या पाठीशी उभे राहून त्यांनी त्यांचा कैवार घेतला आणि समतेचा मंत्र देऊन त्यांनी अस्मिता चेतवली. सामाजिक सुधारणेच्या मवाळ चळवळीला सामाजिक वर्गविग्रहाचे उग्र रूप त्यांनीच दिले. हे सर्व, अव्वल इंग्रजीत, सर्वत्र शुक-शुकाट असताना, सर्वांच्या आधी त्यांनी केले आणि हे स्वतः सामाजिक क्रांतीचा उंच नि अढळ ध्रुवतारा होऊन बसले! आपल्या राष्ट्राने दक्षिण ध्रुव गाठला असेल, पण हा ध्रुव त्याला अद्यापि गाठायचा आहे.

विष्णुशास्त्री नि म. फुले या दोघांचेही वैयक्तिक चारित्र्य म्हणजे विशुद्ध गंगाजल होते. कृष्णशास्त्री बाहेरचालीचे होते आणि लोकमान्य टिळकांनी म्हटल्याप्रमाणे, कृष्णशास्त्र्यांच्या पिढीने पुण्यात तो दुर्गुण शिष्टमान्य करून सोडला होता. पण विष्णुशास्त्री पूर्ण निर्व्यसनी राहिले. बायको अशक्त होती, आजारीपणामुळे सारखी माहेरी असे, मातुश्री दुसऱ्या लग्नाचा आग्रह करीत, पण विष्णुशास्त्र्यांनी दुसरे लग्न केले नाही. आणि वाकडे पाऊल टाकले नाही. त्यांचे चरित्रकारबंधू सांगतात, की ते उशाशी शामदान जळत ठेवून, पालथे पडून, अंथरुणावर वाचीत काळ घालवीत. (पृ. २८०)

म. फुले फटकळ होते. पण आधुनिक संत होते. मूल नव्हते म्हणून वडिलांनी नि सासऱ्यांनी दुसऱ्या लग्नाचा त्यांच्यापाशी हट्ट धरला तर त्यांनी तो धुतकारून लावला. पत्नीशी ते एकनिष्ठ राहिले. त्यांच्या समताप्रेमी संवेदनाशील मनात असा प्रश्न टसठसत होता, की संतती नसल्याने पुरुषाला जर दुसऱ्या लग्नाचा अधिकार असेल तर तो स्त्रीला का नसावा? जातपात ओलांडून त्यांनी एका ब्राह्मण विधवेच्या मुलाला दत्तक घेतले. आंग्लाईतील या एकनाथाने वडिलांच्या अंत्यसंस्कारप्रसंगी अनाथ-अपंगांना भोजन दिले नि गरीब विद्यार्थ्यांना पुस्तके वाटली. अर्धांगवायूने उजवा लिहिता हात लुळा पडल्यावर, आपला 'सार्वजनिक सत्यधर्म' जनांना कळावा म्हणून, हा शूद्र शंकराचार्य मृत्युशय्येवर डाव्या हाताने शेवटपर्यंत लिहीत होता!

विष्णुशास्त्र्यांच्या निर्वाणशताब्दीच्या या वर्षात भोवतालच्या समाजाकडे दृष्टी टाकली की वाटते, ज्यांचे वैयक्तिक चारित्र्य विष्णुशास्त्र्यांसारखे, म. फुल्यांसारखे निर्मळ, निष्कलंक आहे असे लोकनेते हवे आहेत. विचाराप्रमाणे आचार करणारे, बोलघेवडे-पणा न करणारे, पोकळ आश्वासने न देणारे, पुढारी पाहिजे आहेत... आणि विष्णु-शास्त्र्यांची नि फुल्यांची विचारप्रणालीही जागी राहणे आवश्यक आहे. विष्णुशास्त्र्यांचा त्यागी, स्वाभिमानी, कृतिशील राष्ट्रवाद आणि फुल्यांची सामाजिक न्यायाची, समतेची नि बंधुतेची विचारप्रणाली यांत अंतर्विरोध नाही. त्या दोन गोष्टी सुसंगत नि परस्पर-पोषक आहेत, हे आता आपल्याला कळलेले आहे. म. गांधींच्या जीवनाने तर ते प्रत्यक्ष, स्पष्ट दाखवून दिले आहे. तेव्हा, दोन्ही विचारणाली जागवल्या पाहिजेत.

आज समतेचे कायदे झाले, तरी सामाजिक समता आलेली नाही. गिरिजन, हरिजन

आणि दलित विलक्षण त्रस्त, अस्वस्थ नि प्रक्षुब्ध आहेत. त्यासाठी म. फुल्यांची समतेची नि बंधुतेची विचारप्रणाली सर्वत्र पसरली पाहिजे.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपला राष्ट्रवाद पुन्हा गाफील झाला आहे. एकदा गाफील राहून आपण आपले राष्ट्र फुटू दिले. पाकिस्तान जन्माला घातले. अजून अनेक सुप्त पाकिस्ताने या हिंदुस्थानच्या पोटात बीजरूपाने शिल्लक आहेत. कुठे खलिस्थान, कुठे ख्रिश्चनस्थान यांच्या मागण्या ऐकू येत आहेत. देशाच्या सीमेबाहेर मुस्लीम फंडामेन्टॅलिझम—इस्लामी सनातनीपणा—डोके वर काढून हिंदुस्थानासारखी निधर्मी राष्ट्रे फोडू बघत आहे. त्यासाठी, विष्णुशास्त्र्यांच्या स्वत्वाभिमानी, जहाल राष्ट्रवादाची गरज आहे. राष्ट्राचे 'दार्ढ्य' वाढविणारा कृतिशील, त्यागी राष्ट्राभिमान हवा आहे.

वर्तमान काळाची नि येत्या शतकाची अशी मागणी आहे, की आम्हाला विष्णुशास्त्री चिपळूणकर हवे आहेत आणि महात्मा जोतीबा फुलेही हवे आहेत. आम्हाला सामाजिक समता मागणारे चिपळूणकरही पाहिजे आहेत; आणि ज्वलंत राष्ट्रवाद पुकारणारे फुले पाहिजे आहेत. छे ! छे ! प्राप्त काळ वाट बघत आहे विष्णुशास्त्री फुल्यांची ! ! जोतीबा चिपळूणकरांची ! !

•

## ॥ प्रतिक्रिया ॥

### 'राष्ट्रवादाची मूलगामी संकल्पना व विष्णुशास्त्र्यांचा राष्ट्रवाद'

श्री. द. न. गोखले यांनी विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि जोतीराव फुले यांच्यातील वादाचा म्हणजे एकंदरीत महाराष्ट्रातील व भारतातील परंपराभिमानी देशभक्त आणि परंपरेमध्ये मूलगामी सुधारणांचा पुरस्कार करणारे धर्मसुधारक वा समाजसुधारक यांच्यातील वादाचा नीट उलगडा व्हावा म्हणून विष्णुशास्त्री यांच्या 'देशोन्नती' या लेखातील उद्धरण या लेखात दिले आहे. त्यास त्यांनी विष्णुशास्त्र्यांच्या सर्व प्रयत्नांचे आदिरहस्य म्हणून निर्दिष्ट केले आहे—"देशाच्या उत्तम स्थितीचे पहिले लक्षण देशाभिमान होय.…घन पदार्थात जसें दार्ढ्य आढळते. म्हणजे त्यातील परमाणू अगदी परस्परसंलग्न असतात, त्याप्रमाणे राष्ट्राराष्ट्रातील लोकसमुदाय…अभिमानाच्या योगाने जितका एकत्र जखडला गेला असेल तितकी त्याची उन्नतावस्था समजली पाहिजे." या उद्धरणापुढे श्री. द. न. गोखले म्हणतात—"म्हणजे त्यांना सर्वप्रथम देशाभिमान हवा होता आणि त्या अभिमानातून देशाचे दार्ढ्य वाढायला पाहिजे होते."

येथे देशाभिमान म्हणजे राष्ट्राभिमान असा अर्थ विष्णुशास्त्री यांना अभिप्रेत आहे. देश म्हणजे केवळ विशिष्ट भौगोलिक मर्यादेतील प्रदेश नव्हे. विशिष्ट भौगोलिक प्रदेशातील लोकसमुदाय समान हितसंबंधाच्या जाणिवेतून उत्पन्न झालेल्या अभिमानामुळे मनाने एकत्र जखडले जातात, म्हणजे एक प्रकारची मानसिक एकात्मता उत्पन्न होते. राजा राममोहन रॉय, फुले, महादेव गोविंद रानडे, आगरकर इत्यादी सगळे धर्मसुधारक किंवा समाजसुधारक असा अभिमान भारतीय जनतेत उत्पन्न व्हावा म्हणून परस्परविरोधी ऐहिक हितसंबंध वा धार्मिक हितसंबंध निर्माण करण्याकरिता प्रयत्नशील होते. एकात्म भावनेला अत्यंत बाधक असलेली वास्तव सामाजिक स्थिती किंवा बाधक सामाजिक संबंध बदलल्याशिवाय खराखुरा राष्ट्राभिमान किंवा देशाभिमान निर्माण होऊ शकत नसतो. सर्वप्रथम देशाभिमान नव्हे, सर्वप्रथम देशातील सर्व जातिजमातींचे म्हणजे नागरिकांचे हितसंबंध परस्परपोषक व परस्परांच्या आत्मोन्नतीस संपूर्णपणे उपकारक असावे लागतात. असे परस्पर उपकारक नागरिकांचे सामाजिक हितसंबंध वस्तुतः समाजरचनेत दृढमूल झाले असले म्हणजे तेथे राष्ट्र म्हणून एक सामाजिक—राजकीय संघटना अस्तित्वात येते. अशी वरच्या दर्जाची राष्ट्रनामक संघटना भारतात अस्तित्वातच नव्हती, म्हणून भारत वारंवार परकीय आक्रमणाखाली पराभूत झाला, राजकीय दृष्ट्या परतंत्र झाला. अशी ही पारतंत्र्याची मीमांसा विष्णुशास्त्र्यांनी ध्यानात घेतली नाही. त्यामुळे त्यांच्या प्रखर देशाभिमानाच्या मुळाशी देशाभिमानाचे आदिरहस्यच अस्पष्ट राहिले. त्याचे जुजबी आकलन केले गेले. राजा राममोहन रॉय, फुले, स्वामी दयानंद, आगरकर, न्या. रानडे इत्यादिकांना हे देशाभिमानाचे वा राष्ट्राभिमानाचे आदिरहस्य म्हणजे राष्ट्रीयत्वाचे जीवनतत्त्व याचा जसा साक्षात्कार झाला होता, तसा साक्षात्कार चिपळूणकरांना झाला नव्हता. फुले यांच्या 'गुलामगिरी' या निबंधात [ समग्र वाङ्मय पृ. १३५ आणि पृ. ४०७, त्याचप्रमाणे 'सार्वजनिक सत्य धर्म' पुस्तक, समग्र वाङ्मय पृ. ४०७ ] फुले विचारतात की, देशाभिमानाचा पुरस्कार करणाऱ्यांना आमचा असा सवाल आहे की, ज्या ठिकाणी ज्या देशात सगळे नागरिक स्वतंत्र नाहीत, बहुजनसमाज धार्मिकदृष्ट्या अपवित्र आणि काही वरिष्ठच पवित्र अशा तऱ्हेचा अनेक प्रकारे व्यक्त होणारा सामाजिक उच्चनीच भेदभाव आहे तेथे "Nation" असते काय ?

भारत हे एक राष्ट्र आहे, ही जाणीव भारतामध्ये इंग्रजी राज्य संपूर्णपणे स्थिरस्थावर झाल्यावरच निर्माण झाली. इंग्रजांच्या भारतविजयापूर्वी भारत हे एक राष्ट्र आहे, अशी जाणीव कधीही नव्हती. राष्ट्रवादाचा राज्यशास्त्रात व सामाजिक शास्त्रात जो अलीकडे ऐतिहासिक परामर्ष घेतला जातो, त्यानुसार राष्ट्र ही राजकीय संकल्पनाच मुळी अठराव्या शतकात जगात उत्पन्न झाली. अठराव्या-एकोणिसाव्या शतकात युरोपात व अमेरिकेत राष्ट्र-राज्ये ( Nations states ) निर्माण झाली. ती बहुतेक

लहानसे अपवाद सोडल्यास समान–भाषिक प्रदेश–राज्ये म्हणून अस्तित्वात आली. उदा. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, स्पेन, इटली, अमेरिकेतील संयुक्त संस्थाने इत्यादी. युरोपातील एकेका राष्ट्राएवढे भारतातील भाषिक प्रदेश आहेत. येथेही अठराव्या-एकोणिसाव्या शतकात देशाभिमानाचा प्रखर उदय झाला असता, तर येथेही भाषिक प्रदेश हीच राष्ट्रे म्हणून स्थापन झाली असती. परंतु येथे ब्रिटिशांपूर्वी राजकीय अस्थिरता होती शेकडो लहानमोठी राज्ये होती. भाषिक संस्कृतीच्या अधिष्ठानावर प्रादेशिक एकराज्यस्थापनेची स्फूर्ती सामाजिक नेत्यांना लाभली नव्हती.

या देशामध्ये भारत हे एक राष्ट्र आहे अशा तऱ्हेची व्यापक राष्ट्रजीवनाची भावना सार्वत्रिक इंग्रजी पारतंत्र्याच्या दृढ संदर्भात निर्माण झाली. महादेव गोविंद रानडे यांच्यासारख्या महान चिंतनशील द्रष्ट्यांच्या लक्षात आले, की इंग्रजी पारतंत्र्य हा जसा शाप आहे तसे ते वरप्रदानही आहे. एका आधुनिक, विकसित संस्कृतीने संपन्न अशा परकीय राजकीय शक्तीचा संबंध निर्माण झाल्यामुळे भारत आधुनिक, पुढारले राज्य निर्माण होण्याची शक्यता निर्माण झाली. ह्या भविष्याचे ह्या देशातील एकमेव द्रष्टे म्हणजे महादेव गोविंद रानडे होत. हिंदुत्व शतकानुशतके दुबळे राहिले, म्हणून भारत पारतंत्र्यात वारंवार सापडला. याचे प्रकट दर्शन महर्षी स्वामी दयानंदांना झाले म्हणून त्यांनी जन्मजात जातिभेद व मूर्तिपूजा ह्यांसारख्या दौर्बल्यकारक परंपरांना मूठमाती देणारा विश्वव्यापी महत्त्वाकांक्षेचा आर्यधर्म उपदेशिला. अशा तऱ्हेचे दयानंद हजार वर्षांपूर्वी या देशात उत्पन्न झाले असते, तर हा देश परतंत्र झाला नसता. एवढेच नव्हे, तर जगातील एक थोर राष्ट्र म्हणून तळपत राहिला असता. दयानंदांची निंदा करणाऱ्या विष्णुशास्त्र्यांना परंपरागत हिंदुत्वाची दौर्बल्यकारक स्थानेच लक्षात आली नव्हती. म्हणून एकंदरीत ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे, की विष्णुशास्त्र्यांना देशाचा जसा कळवळा व अभिमान होता, तसाच उत्कट कळवळा फुले इ. समाज-सुधारकांना व धर्मसुधारकांनाही होता. त्याकरिता त्यांनीही अग्निदिव्याची प्रतिज्ञा केली होती. त्यांनीही महान त्याग केला होता, ही गोष्ट आम्ही द. न. गोखले यांच्या लेखाच्या वाचकगणांपुढे मांडीत आहोत. द. न. गोखले यांनी व्यासंगपूर्वक लेख लिहून हे मांडण्याची संधी दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

यासंदर्भात विष्णुशास्त्री चिपळूणकर पुण्यतिथी शताब्दिनिमित्त ‘नवभारत’ मासिकाच्या विशेषांक येत्या आक्टोबरमध्ये प्राज्ञपाठशाळा मंडळातर्फे प्रसिद्ध होईल. त्यात यासंबंधी विशेष सविस्तर, सर्वांगीण, परामर्श विविध साहित्यिक व राज्यशास्त्रज्ञ यांच्या लेखांमधून प्रसिद्ध होईलच.

**लक्ष्मणशास्त्री जोशी**

■

## विष्णुशास्त्र्यांवरचा अन्याय दूर केला !

द. न. गोखले यांचा वरील लेख अनेक दृष्टीने चालना देणारा आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेवर गेल्या काही वर्षांत जाणीवपूर्वक जो अन्याय होतो आहे, तो दूर करण्याचे कार्य कोणी तरी करायलाच हवे होते. १९३५ पर्यंत शास्त्रीबुवांना वैचारिक जगात मान्यता होती. आणि त्यानंतर त्यांचे अवमूल्यन करून फुले यांचे श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्याचा उद्योग चालू झाला. या दोन्ही भूमिका एकांतिकच होत्या. इतिहासकालीन पुरुषांची चिकित्सा करताना सर्व तत्कालीन संदर्भ विचारात घेतले पाहिजेत. ते न घेता वर्तमानाला उपयोगी पडणारे व कललेले विचारमंथन नुसते अन्याय-जनक होते असे नाही तर त्यामुळे समाजाची उर्जास्थाने नष्ट होतात. पुढील पिढ्यांना सातत्याने लाभणारी उर्जा आपण अकारण हिरावून घेतो. सारा समाज पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाने इंग्रजी शिस्तबद्ध कारभाराने भारून गेलेला होता त्या काळात एका तरुण पुरुषाने या महाकाय देशालाही काही सत्त्व आहे हे सांगण्याचा एकाकी प्रयत्न केला. त्याच्या या प्रयत्नाआड येणाऱ्यांची त्याने कठोर निर्भत्सना केली. या निर्भर्त्सनेत लोकहितवादी आणि फुले सापडले आहेत. शास्त्रीबुवांचा हेतू जर शुद्ध, उदात्त आणि देशहिताचा होता तर त्यासाठी काही लोकांना खर्ची पडावे लागले–याकडे वेगळ्या दृष्टीने पाहिले पाहिजे. एक पाय तुरुंगात टेवूनच वर्तमानपत्राचा उद्योग ज्याने केला त्या चिपळूणकरांना समजावून घेण्यासाठी केवळ त्यांची कठोर तुच्छतादर्शक भाषा विचारात घेऊन कसे भागेल ? स्वातंत्र्याच्या चळवळीचा एक आद्य प्रणेता म्हणून चिपळूणकरांच्याकडे जर नजर टाकली तर स्वातंत्र्यविरोधी चळवळींना, व्यक्तींना आणि सांप्रदायांना कठोर शब्दांत त्यांनी टोकून काढले तर ते यथायोग्यच झाले असे म्हटले पाहिजे. कारण इंग्रजी राज्य हे वरदान आहे, इंग्रजी राज्य सुस्थिर झाले तरच तळागाळातील लोकांना न्याय मिळेल, शिवछत्रपतींनी स्वराज्य संपादन करून बहुजन समाजाच्या उद्धाराचा मार्ग बिकट केला; अशी विधाने करणाऱ्यांवर स्वातंत्र्य-कल्पनेने भारलेल्या तरुणांनी कोणत्या शब्दात हल्ला करायला पाहिजे ? हल्ला सुधारणां-च्यावर नव्हता, समतेवरही नव्हता तर मिशनऱ्यांच्या सहाय्याने आपल्या समाजाची अस्मिता नष्ट करणाऱ्या व त्यायोगे इंग्रजी राज्य सुस्थिर करणाऱ्या प्रवृत्तींवर होता. विष्णुशास्त्र्यांनी ऐन पंचवीशीत केलेले लेखन आहे आणि वयाच्या बत्तीसाव्या वर्षी तर त्यांचा ग्रंथच आटोपला. एक पोरसवदा माणसाने प्रौढ आणि प्रगल्भ माणसांशी केलेले हे युद्ध आहे याचा मुद्दा विसर पडू देता कामा नये. राजसत्तेचा आश्रय असणारे फुले आणि लोकहितवादी यांच्या विरुद्ध एकाकी असणाऱ्या तरुणाचे हे भांडण आहे. बहुजन समाजावर अन्याय झालेला आहे व तो दूर करण्याची आव-

अनुक्रमणिका

श्यकता आहे, असे शास्त्रीबुवांना वाटत नव्हते असे थोडेच आहे? याचे पुरावे जागोजागी त्यांच्या लेखनात सापडतात. फुले यांनी बहुजन समाजाच्या उद्धारार्थ ब्राह्मणांविरुद्ध, हिंदुधर्मरचनेविरुद्ध आणि प्रस्थापित परंपरांविरुद्ध जो आसूड उगारला त्याची कारणे बरोबर असली तरी त्यांचे इतिहासाचे ज्ञान खूपच कच्चे आहे हे पुढे सिद्ध झाले आहे. स्वातंत्र्य गेले ते काही सामाजिक विषमतेमुळे गेले नाही. शिवाजीने महाराष्ट्रराज्य स्थापले तेव्हाही त्या स्थापनेच्या आड येथील जातीसंस्था आली नाही. येथील स्वातंत्र्य जाण्याची कारणे निराळी होती व त्यांचा ऊहापोह इतिहासाचार्य राजवाडे यांनी विस्तृतपणे केला आहे. चिपळूणकरांच्या आणि टिळकांच्या म्हणण्याप्रमाणे स्वातंत्र्यानंतर सामाजिक सुधारणा करणे सोपे होईल, हेही त्यांचे म्हणणे खरेच ठरले. स्वातंत्र्य आल्यामुळेच कायद्याच्या आणि घटनेच्या आधाराने बहुजन समाजाला सुखी करणे आज शक्य झाले आहे. सामाजिक सुधारणा आकस्ताळेपणाने अमलात आणता येत नाहीत. कारण समाजमनाची तयारी झाल्याशिवाय देऊ केलेल्या सुधारणा प्रत्यक्षात समाजाला भोगता येत नाहीत. फुले यांचा आक्रोश सत्य होता. परंतु त्या आक्रोशाला इंग्रजी सत्तेचे अस्तित्व आवश्यक नव्हते. भारतीय परंपरांच्या गुलामगिरीतून बाहेर पडणाऱ्यांना इंग्रजांची गुलामगिरी चालावी ह्यात काहीच विपरीत नाही काय? फुले एकाकी पडले आणि त्यांची स्वप्ने पुरी होण्यासाठी पन्नास-पाऊणशे वर्षे जावी लागली, याचे एकमेव कारण फुले हे परधार्जिणे आहेत, इंग्रजांचे आणि मिशनऱ्यांचे हस्तक आहेत आणि समाजात बेदिली माजवून इंग्रजी राज्य सुस्थिर करणारे आहेत असा फुल्यांच्याबद्दल लोकांचा समज झाला. आज शंभर वर्षांनंतरसुद्धा जर आपण दोन महापुरुषांच्या कार्याची चिकित्सा अलिप्तपणे करू शकत नसू तर ती दुर्दैवाची गोष्ट आहे. या समाजाला दोघांनीही काही दिले आहे. फुल्यांच्या प्रेरणेतून कर्मवीर शिंदे, आंबेडकर, केशवराव जेधे, शाहू महाराज यांसारखी बहुजन समाजाचा कळवळा असणारी माणसे निर्माण झाली. तशीच शास्त्रीबुवांच्या शिकवणीतून देशभक्तांची एक लांबलचक फौज निर्माण झाली. देशावर प्रेम करायचे म्हणजे आपला इतिहास, संस्कृती, भाषा, विज्ञान या साऱ्यांवर प्रेम करायचे ही त्यांनी प्रेरणा घेतली. टिळक, आगरकर, राजवाडे, सावरकर, केतकर ही माणसे असीम देशभक्तीने समाजरचनेचा पुनर्विचार करू लागली आणि त्यामुळेच या देशात स्वातंत्र्याचे यज्ञकुंड पेटले. त्यामुळेच स्वातंत्र्याची ऊर्जा देणारे शास्त्रीबुवा विसरून भागणार नाही. त्याचप्रमाणे दीर्घकालीन अन्यायाविरुद्ध फुल्यांनी प्रथमच केलेला आक्रोश विसरून चालणार नाही.

पण या देशात लोकशाही आली म्हणजे बहुजन समाजाचा विचार केल्याशिवाय भागणार नाही याचे भान फुल्यांना असावे तितके दिसत नाही. स्वातंत्र्यातून लोकशाही आली आणि लोकशाहीतून बहुजनहिताचा रस्ता दिसू लागला, हे पाहिले

अनुक्रमणिका

म्हणजे दोन वेगवेगळ्या विचारांच्या नद्या अखेरी एकत्र आल्या असेच म्हणावे लागेल. कालसापेक्ष समीक्षेच्या अभावातून दोघांच्यावरही झालेले अन्याय धुऊन काढण्याचा आज समय आला आहे.

**ग. वा. बेहेरे**

## दोन महापुरुषांची सम्यक चिकित्सा

कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या शंभराव्या पुण्यतिथीला अनुलक्षून डॉ. द. न. गोखले यांनी जे व्याख्यान साहित्य–परिषदेत दिले ते मी ऐकले होते. आज त्या व्याख्यानावरची टंकलिखित प्रत वाचायला मिळाली.

इतके दिवस चिपळूणकर आणि फुले यांच्यातील मतभेदांची चिकित्सा डॉ. गोखले यांच्या पद्धतीने कोणी केली नव्हती. दोघांपैकी एकाची बाजू घेऊनच वाद चालत असे. चिपळूणकरांच्या मृत्यूला यंदा शंभर वर्षे झाली. आणखी आठ वर्षांनी फुल्यांचीही शंभरावी पुण्यतिथी येईल. एवढा काल उलटल्यानंतर आणि विशेष म्हणजे एका युगातून आपला देश दुसऱ्या युगात प्रविष्ट झाल्यानंतर निर्विकारपणे या दोन्ही थोर पुरुषांची मते भावनाविवश न होता तपासली जावयास हवीच होती. ते कार्य डॉ. गोखल्यांनी चांगल्या प्रकारे केले आहे असे मला वाटते.

आधी राजकीय की आधी सामाजिक या वादात आधी राजकीय वाल्यांचा जरी विजय झाल्यासारखा दिसत असला तरी राजकीय अधिकार मिळाले की स्वराज्यात आपण सामाजिक न्यायाची प्रस्थापना जलद व सहज करू ही आधी राजकीय वाल्यांची कल्पना साफ चुकीची ठरलेली आहे, हे मान्य करायला हवे. आणि ते मान्य केले की फुल्यांचे सामाजिक विचार कसे मूलभूत महत्त्वाचे होते ते लक्षात येते.

आपल्या देशांतील जातिभेद व धर्मभेद इंग्रजांनी आणलेले नव्हते. त्यामुळे इंग्रज गेले तरी त्यांच्याबरोबर ते गेले नाहीत. आज, म्हणजे स्वराज्य मिळाल्यानंतर पस्तीस वर्षांनी, ते तीव्रतर होत चाललेले दिसतात. फुल्यांना जसा इंग्रजी शासनाचा राजकीय व आर्थिक आशय समजला नव्हता तसा चिपळूणकरादिकांना जातिधर्मभेदांचा चिवटपणा व विषारीपणा आकलन झाला नव्हता. त्यांना न लाभलेली सम्यक बुद्धी आपण जे त्यांच्या चौथ्या पिढीतले भारतीय त्या आपणाला तरी मिळो. नाही तर या देशाची काही धडगत नाही.

**ना. ग. गोरे**



अनुक्रमणिका

## लेखकाचे उत्तर

'विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि महात्मा फुले' या माझ्या लेखावर म. सा. पत्रिकेच्या संपादकांनी काही थोर व्यक्तींची मते मागविली हा मी त्या लेखाचा गौरव समजतो. राष्ट्रवाद नि समाजसुधारणावाद या विचारधारा भिन्न असल्या तरी परस्पर-विरोधी नाहीत, त्या परस्परपूरकच आहेत, अशा माझ्या लेखाची वैचारिक बैठक आहे. तिच्याकडे या थोर व्यक्तींच्या मतांमुळे विशेष लक्ष वेधले जाईल असे मी मानतो. श्री. नानासाहेब गोरे, श्री. ग. वा. बेहेरे आणि तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी माझ्या लेखाचा जो परामर्श घेतला त्याबद्दल मी कृतज्ञ आहे.

माझ्या लेखात विष्णुशास्त्री आणि म. फुले यांचे तौलनिक अवलोकन मी केले आहे, दोघांचे वैयक्तिक गुणावगुण नि वैचारिक बलाबल दाखविले आहे, आणि दोघांचीही प्राप्त कालाला गरज आहे असा निष्कर्ष काढला आहे. लेखाच्या या आशयाला एकंदरीने कोणाचाच विरोध दिसत नाही. उलट, श्री. गोरे व श्री. बेहेरे यांनी प्रत्यक्षपणे नि तर्कतीर्थ जोशी यांनी अप्रत्यक्षपणे त्याविषयी अभिज्ञता व्यक्त केली आहे. तेव्हा, काही आनुषंगिक नि स्फुट विधानांविषयी माझ्या प्रतिक्रिया संक्षेपाने व्यक्त केल्यास हे उत्तराचे काम साधण्यासारखे आहे.

(१) "सर्व प्रथम देशाभिमान नव्हे" असे तर्कतीर्थ सांगतात. त्यांच्या मते, "देशातील सर्व जातीजमातींचे म्हणजे नागरिकांचे हितसंबंध परस्परपोषक व परस्परांच्या आत्मोन्नतीस संपूर्णपणे उपकारक असावे लागतात." असे हितसंबंध समाजरचनेत "दृढमूल" झालेले असले म्हणजे "तेथे राष्ट्र म्हणून एक सामाजिक राजकीय संघटना अस्तित्वात येते." या मतात, आधी राष्ट्र मग राष्ट्राभिमान असा क्रम अभिप्रेत आहे. राष्ट्र अस्तित्वात येण्यासाठी तेथील समाज-समूहांचे हितसंबंध परस्परपोषक राहातील अशी समाजरचना हवी, अशीही कल्पना अध्याहृत आहे. पण मला हे मत अर्धसत्य वाटते. राष्ट्र म्हणजे मोठ्या समाजात कमीअधिक प्रमाणात नांदणारी समूहभावना किंवा ऐक्यभावना असते. ती अनेक कारणांनी रुजते नि वाढते. त्या मोठ्या समाजात लहान गटांचे हितसंबंध परस्परपूरक ठेवणारी समाज-रचना विद्यमान असेल तर राष्ट्रभावना त्वरेने वाढते नि दृढमूल होते यात तिळमात्र शंका नाही. पण अशी समाजरचना पूर्णांशाने विद्यमान नसली तरीही राष्ट्रभावना रुजू-वाढू शकते. हिंदुस्थानात हिंदू-मुसलमान-ख्रिश्चनांचे धार्मिक (religious) हितसंबंध परस्परपोषक होतील अशी समाजाची मांडणी अद्यापि झालेली नाही. विशेषतः मुसलमान व ख्रिश्चन यांचा धार्मिक कडवेपणा नि स्वतःचा गट वाढविणारा आक्रमक धर्मप्रसार तशा मांडणीच्या आड येत आहे. काही मुसलमानांच्या देशबाह्य निष्ठाही तशा मांडणीशी प्रतिकूल आहेत. हिंदूत, परस्परपोषक हितसंबंधांना जपणाऱ्या

समाजरचनेला, जातिभेद हा मोठा अडसर आहे. म्हणजे तर्कतीर्थ म्हणतात तशी समाजरचना हिंदुस्थानात नाही तरीही हिंदुस्थान नामक राष्ट्र अस्तित्वात आहे की नाही ? त्याचा अभिमान बाळगणारे लक्षावधी भारतीय आहेत की नाही ? आणि त्या अभिमानामुळेच तर्कतीर्थांना अभिप्रेत असणारी समाजरचना निर्माण करायला शेकडो देशभक्त कटिबद्ध झालेले आहेत की नाही ? हजारो वर्षांच्या परंपरेने, समान नि समावेशक संस्कृतीने, आणि इंग्रजांसारख्या एकाच शत्रूशी कराव्या लागलेल्या स्वातंत्र्यसंग्रामाने येथील राष्ट्रभावना वाढलेली आहे. तेव्हा, राष्ट्राचे पूर्ण दृढीकरण होण्यासाठी त्यातील निरनिराळ्या समाजगटांच्या हिताचा समन्वय आवश्यक असला, तरी त्या समन्वयाखेरीज राष्ट्र असू शकत नाही नि राष्ट्राभिमान संभवत नाही, हे खरे नाही. शिवाय, राष्ट्र ही ठराविक पायऱ्यांनी साध्य होणारी साचेबंद प्रक्रिया असत नाही. ती निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या प्रकारांनी साधली जाते नि निरनिराळ्या प्रमाणात अस्तित्वात असते. तेव्हा, "सर्वप्रथम" स्वाभिमान की योग्य समाजरचना हा वाद राष्ट्रघटनेत निरर्थक होय. सद्यःस्थितीत, कोणी राष्ट्राच्या अभिमानाने प्रेरित होऊन समाजरचना बदलू बघतील, तर कोणी समाजरचनेतील अन्यायानेच संतप्त किंवा व्यथित होऊन समाजरचना बदलतील नि राष्ट्र अभिमानास्पद करून सोडतील. दोघांचेही मनःपूर्वक स्वागत व्हावे.

(२) तर्कतीर्थ म्हणतात, की योग्य समाजरचना हे देशाभिमानाचे आदिरहस्य होय. "राजा राममोहन रॉय, फुले, स्वामी दयानंद, आगरकर, न्या. रानडे इत्यादिकांना हे देशाभिमानाचे वा राष्ट्राभिमानाचे आदिरहस्य, म्हणजे राष्ट्रीयत्वाचे जीवनतत्त्व, याचा जसा साक्षात्कार झाला होता तसा साक्षात्कार चिपळूणकरांना झाला नव्हता." या म्हणण्यातील जसा-तसा ही शब्दरचना लक्षणीय आहे. योग्य समाजरचनेचे रहस्य जसे न्या. रानडे वगैरेंना कळले होते तसे चिपळूणकरांना कळले नसेल, हे शक्य आहे. अवघ्या बत्तीस वर्षांच्या आयुर्मानात त्यांना ते तसे कळले नसेल तर ते समजूनही घेता येईल. पण ते त्यांना अजिबात कळले नव्हते असे दिसत नाही. जातिभेदाने "राष्ट्राची फूट अतिशयितच पाडली आहे...पण लोकांचे डोळे अजून उघडत नाहीत."–हे त्यांचे माझ्या लेखात उद्धृत केलेले उद्गार या संदर्भात लक्षणीय आहेत.

(३) "इंग्रजांच्या भारत-विजयापूर्वी भारत हे एक राष्ट्र आहे, अशी जाणीव कधीही नव्हती"– असे तर्कतीर्थांचे म्हणणे आहे. ते म्हणणे स्पष्ट करताना ते सांगतात, की "राष्ट्र ही राजकीय संकल्पनाच मुळी अठराव्या शतकात जगात उत्पन्न झाली." पण राष्ट्रकल्पना केवळ राजकीय नाही; तीमध्ये भरपूर सांस्कृतिक आशय आहे; मुख्य म्हणजे, मोठ्या समाजात जेव्हा जीवन परस्परसंबद्ध बनते नि ऐक्यभावना वाढते तेव्हा तो समाज राष्ट्र होतो; असे मानणारी एक विचारधारा आहे. त्या विचारधारेप्रमाणे इंग्रज हिंदुस्थानात येण्यापूर्वी कित्येक शतके येथील समाजाने राष्ट्र-पदवी मिळवलेली

होती. ते राष्ट्रीयत्व कालगतीने, किंवा नवनव्या आक्रमणांनी, किंवा बदलत्या कल्पनांनी कमजास्त दृढ किंवा शिथिल होत गेले; पण ते नव्हते असे म्हणता येणार नाही.

( ४ ) शेवटी तर्कतीर्थ म्हणतात, की विष्णुशास्त्र्यांना देशाचा जसा कळवळा व अभिमान होता, तसाच उत्कट कळवळा फुले इ. समाजसुधारकांना व धर्मसुधारकांनाही होता. त्याकरिता...त्यांनीही महान त्याग केला होता. ही गोष्ट आम्ही द. न. गोखले यांच्या लेखाच्या वाचकगणांपुढे मांडीत आहोत." तर्कतीर्थ आवर्जून ही गोष्ट का मांडतात ते कळत नाही. चिपळूणकर नि म. फुले यांच्या तुलनेत, समाजाचा उत्कट कळवळा एकाला होता नि दुसऱ्याला नव्हता, असा मुद्दा माझ्या लेखात नाही, मुद्दा आहे तो राष्ट्रवादाचा नि राष्ट्रीय स्वातंत्र्याचा आहे. त्या दोन संकल्पना म. फुल्यांच्या विचारसरणीत होत्या का? नसल्यास त्याची कारणे कोणती? त्या संकल्पना नसणे, किंबहुना त्यांना विरोध असणे, हे समर्थनीय आहे का?–वगैरे प्रश्नांचा विचार त्यासाठी व्हावयास हवा. पण तो विचार बाजूस टाकून भलतीच गोष्ट तर्कतीर्थांनी आवर्जून सांगावी, याचे आश्चर्य वाटते. म. फुल्यांचे दलित समाजाबद्दलचे अपार प्रेम नि त्यांच्या कार्याची असामान्य महती कोणीही मान्य करील, पण 'म. फुले, राष्ट्रवाद नि राष्ट्रीय स्वातंत्र्य' या विषयावरील तर्कतीर्थांचा सुस्पष्ट विचार ऐकण्यासाठी मी आणि माझ्यासारखे कित्येक जिज्ञासू वाचक सदैव उत्सुकच राहतील.

( ५ ) श्री. बेहेरे यांच्या लेखात "स्वातंत्र्य गेले ते काही सामाजिक विषमतेमुळे गेले नाही" असे विधान आहे. काही राष्ट्रवादी मंडळींच्या विचार विश्वात अशी एक समजूत दिसते, की राष्ट्रीय स्वातंत्र्य, राष्ट्रबलवर्धन, राष्ट्रैक्य, राजकीय प्रगती, देशाभिमान वगैरे गोष्टींचा समाजरचनेशी नि तदन्तर्गत धर्मभोळेपणा, विज्ञानविरोध, विषमता, जातिभेद वगैरे गोष्टींशी काही संबंध नाही. त्या समजुतीचे प्रतिबिंब श्री. बेहेरे यांच्या विधानात पडलेले असेल किंवा नसेलही; पण श्री. बेहेरे यांच्या विधानाचे निमित्त करून त्या समजुतीविषयी थोडे लिहायला हवे. माझ्या मते ही समजूत अत्यंत भ्रामक आहे. राजकीय प्रगती नि सामाजिक प्रगती काही मर्यादेपर्यंत अलग राहून स्वतंत्रपणे वाटचाल करू शकतात. पण शेवटी त्या परस्परावलंबीच असतात. हिंदूमधील जाती बाहेरील व्यक्तींना आत घेऊ शकत नाहीत, हिंदूमधील धर्मसंप्रदाय धर्मांतराने स्वतःचे संख्याबल वाढविण्याविषयी उदासीन आहेत; त्यामुळेच धर्मांतराचा छळाबळाने पुरस्कार करणारा आक्रमक मुसलमान समाज हिंदुस्थानात प्रमाणतः अधिक वाढला. हिंदुस्थानात मुसलमानांची सत्ता आली, फोफावली, नि दीर्घकाळ टिकली त्याला या परिस्थितीने खूपच हातभार लावला. हिंदुस्थानची शकले उडून पाकिस्तान निर्माण झाले त्यालाही ही परिस्थितीच बव्हंशी कारणीभूत आहे. जातिभेदाने हिंदू समाज भेगाळलेला होता, हिंदू नि मुसलमान एक झालेले नव्हते, म्हणूनच एकेका गटाचा पराभव करीत करीत इंग्रजांनी सुलभतेने हिंदुस्थान जिंकला आणि

अनुक्रमणिका

त्यावर दीडशे वर्षे राज्य केले. आजही हिंदूतील तथाकथित कनिष्ठ जाती विषमतेला किटून धर्मांतराकडे वळत आहेत आणि केवळ हिंदू समाजच नव्हे तर हिंदी राष्ट्र खिळखिळे होत आहे. तेव्हा, राजकीय प्रगती नि सामाजिक प्रगती यांचा परस्परसंबंध लक्षात घेऊन जहाल राष्ट्रवाद्यांनीही सामाजिक प्रश्नांना हात घालण्याची वेळ आली आहे.

द. न. गोखले

■



कविवर्य अनिल

# एक फुलवात

मा. कृ. पारधी

दिल्लीत, मौलाना आझाद रस्त्यावर, विज्ञान-भवनासमोर, मीनाबाग. दुमदार दुमजली इमारतींची लहानशी वस्ती. संसद-सदस्य व बड्या सरकारी अधिकाऱ्यांसाठी तिथे वरच्या मजल्यावरच्या एका फ्लॅटमध्ये वीस वर्षांपूर्वी आत्माराम रावजी उर्फ आप्पासाहेब देशपांडे, म्हणजे कवि 'अनिल', व कुसुमावतीबाई हे दांपत्य राहात होते. आप्पा त्या वेळी भारत सरकारने नव्यानेच काढलेल्या इन्स्टिटयूट ऑफ फंडा-

अनुक्रमणिका



मेंटल एज्युकेशन या प्रौढ-शिक्षण-प्रसारक संस्थेचे पहिले संचालक होते आणि कुसुमावतीबाई आकाशवाणीच्या महासंचालनालयात महिला-कार्यक्रम विभागाच्या प्रमुख होत्या.

त्यांचे घर म्हणजे स्थानिक व बाहेरून येणाऱ्या साहित्यिकांनी व कलावंतांनी आवडीने भेट देण्याचे एक प्रमुख मराठी ठिकाण. साऊथ ॲव्हेन्यूमध्ये पंडित नेहरूंच्या महालासमोर मामा वरेरकर आणि हेली रोडवर प्रभाकर पाध्ये हे साहित्य-कलांचे आणखी दोन मराठी अड्डे. पाध्ये, मामा, आप्पा व बाई चौघेही आमच्या दिल्ली मराठी साहित्य संघाचे एकामागून एक अध्यक्ष किंवा कार्याध्यक्ष होते.

मामांचे घर म्हणजे धर्मशाळा. पाध्यांचे घर म्हणजे एका बड्या संस्थेचे कार्यालय. आप्पा-बाईंचे मात्र घर म्हणजे घर दार उघडले जाण्यासाठी बाहेरून येणाऱ्याला प्रथम दारावरची घंटी वाजवावी लागते. बहुधा बाईच दार उघडतात. हसतमुखाने ' या ' म्हणतात. आत दाराशीच कोपऱ्यात पायताणे ठेवण्याची खास जागा. समोर लहानसा दिवाणखाना. नीटसपणे सजवलेला. दाराच्या एका बाजूला खुर्च्यांची बैठक. दुसऱ्या बाजूला गाद्या-लोडांची वऱ्हाडी बैठक. रंग-संगती साधलेली. पाठीशी भिंतींना गवताच्या सरांच्या चटया मढवलेल्या. सजावटीत देखावा नाही. साधी आणि सुंदर. नागपूरला धनतोलीवर कॉंग्रेस पार्क समोरच्या त्यांच्या प्रशस्त बंगल्यातही अशीच गावरान साधेपणात सुंदरता ओतलेली. बाहेरच्या आवारातील झाडा-झुडपांच्या संगतीत मूर्ती मांडून ठेवलेल्या. वऱ्हाडात वणीजवळच्या माळावर इतस्ततः विखुरलेल्या जुन्या शिल्पांच्या अवशेषांतून आप्पांनी सावधगिरीने पळवलेल्या मूर्ती त्यात असाव्यात. किंवा त्यांच्या संशोधक भ्रमंतीत इतर ठिकाणांहून जमवलेल्या. त्या माळावरील शिल्पांची दुर्दशा त्यांनीच एकदा मला सांगितली होती.

भेटायला येणाऱ्या माणसाच्या इतमामानुसार आप्पांची औपचारिक बैठक खुर्च्यांवर आणि अनौपचारिक बैठक गादी-लोडावर. साहित्यिक मैफली रंगायच्या त्या गादी-लोडाच्या बैठकीवर. मामांकडची बैठक म्हणजे टवाळक्या. पाध्यांकडची बैठक म्हणजे गंभीर चर्चा. आप्पांकडची बैठक म्हणजे काव्य-शास्त्र-विनोद. कधी कधी या बैठकीला मद्याची खुमारी येई. पण विड्याशिवाय कधीच बैठक रंगायची नाही. आप्पा आपला विडा स्वतःच्या हाताने तयार करीत. कधी अनभिज्ञ पाहुण्यालाही जमवून देत. सराईतापुढे डबा सरकावीत. रामटेकी कळीदार मुलायम पानांच्या शिरा काढीत, चुना काथ लावून सुपारी कातरीत, त्यावर थोडासा सातारी जर्दा आंथरीत, सावकाश पान चघळत, ते गप्पांना रंग भरत. ओठ सदा रंगलेले. एक विडा खाऊन संपला की दुसऱ्याची तयारी. सोबत बोलणे चालूच.

विडा तबियतीने खाण्याचे त्यांचे केवळ तंत्रच नव्हते; तत्त्वही होते. पहिल्यांदा मी त्यांच्याकडे विडा खाल्ला तेव्हा तंबाखूची पहिली पिंक सवयीनुसार बाहेर थुंकायला मी

अनुक्रमणिका

उठलो. तेव्हा ते म्हणाले, " अहो, विडा असा खायचा नसतो."

" मग कसा ? "

" न थुंकता. "

" पण मग तंबाखू लागतो ना ? "

" तंबाखू इतकाच खायचा की पानाची लज्जत वाढेल पण थुंकावं लागणार नाही. हा आमचा अथुक संप्रदाय."

तेव्हापासून मी आप्पांच्या अथुक संप्रदायाचा निष्ठावंत अनुयायी झालो आहे. पान खाण्यातील त्यांचा तो संयमी राजसीपणा त्यांच्या बोलण्यात, साहित्यात व व्यक्तिमत्त्वात अनुभवला आहे.

त्यांचे दर्शन सौम्य व शालीन. चालणे जरा लेपसटच. चेहेऱ्याची ठेवण बसकी. किंचित पुढे झुकणाऱ्या हनुवटीवर रुंद जिवणीची बसकण. डोळे लहान. कपाळ उंच व पसरलेले. हासणे बेताचे, पण मनमोकळे. आवाज काहीसा जाड व बसका. बोलण्यात मार्दव, जरा मिस्किलपणा. बोलण्याची पद्धत संथ व वेल्हाळ. अशा बोलण्याला धार येऊच शकत नाही. त्यांच्या कवितेत ' चिडून उठू आम्ही ' असा त्वेषाचा स्वर अनेकदा लागला. ' प्रक्षोभ ' नावाचा नवा रस आपल्या प्राचीन रस-व्यवस्थेत घातला पाहिजे असा आग्रह त्यांनी एका काळी धरला होता. पण मनात चीड असली तरी बोलण्यातून उतरताना ती मऊ व्हायची.

आप्पांचा परिचय मला प्रथम त्यांच्या ' फुलवात ' मधून झाला. तोपर्यंत मी वाचलेल्या केशवसुतांपासून रवि-किरणांपर्यंतच्या कवितेहून ही कविता अगदी वेगळी होती. हृदयाच्या गाभ्याला स्पर्श करणारी, गूढाची ओढ लावणारी, प्रीतीच्या हळुवार मोहकतेची भुरळ घालणारी. तिच्यातील गूढ आशय स्पष्ट होत नव्हते, तरी जिवाला भारून टाकत होते. या कवितेने मला वेड लावले होते. वारंवार वाचून वाचून सारी ' फुलवात ' पाठ झाली होती. कित्येक कविता मी माझ्याच चाली लावून ऊठ-सूट गात असे.

तेव्हा मी नागपूरच्या मॉरिस कॉलेजात शिकत होतो. कुसुमावतीबाई आम्हाला इंग्रजी साहित्य शिकवत असत. या बाईंविषयी मला विलक्षण कुतूहल होते. बाई-माणसाने शिकविणे तोपर्यंत मला नवीन होते. चेहेऱ्याच्या मानाने कपाळ फार उंच व विशाल असलेली ही मेधावी, निर्भय व तेजस्वी मुद्रेची, नितळ गोरीपान, शेलाट्या अंगलटीची तरुण बाई विद्यार्थ्यांसमोर उभी राहून शिकवताना फार खेळकर होत असे. एकदा बॉस्वेलच्या जॉन्सनमधील एक मजेदार प्रसंग समजावून सांगताना ती स्वच्छ मराठीत म्हणाली, " इश्श, मला बाई लाज वाटते. " आणि हसत हसत चक्क लाजली. सारा वर्ग गारेगार.

बाई स्वतःच्या मोटरगाडीतून, स्वतः गाडी चालवीत, कॉलेजात येत असत. आप्पांशी

अलीकडेच झालेल्या त्यांच्या प्रेम-विवाहाविषयीही विद्यार्थ्यांमध्ये कुजबुज चालत असे. त्या काळी प्रेमासाठी केवढे धाडस! त्यामुळे ह्या जगावेगळ्या कलावंत व प्रेमी जोडप्याशी मी मनाने जुळलो होतो. त्यात 'फुलवात'ची भर पडली. हृदयाला भिडणाऱ्या पण बुद्धीला न आकळणाऱ्या काही गूढ कविता आपण बाईंना विचाराव्यात, असे अनेकदा मनात आले. पण तो काळ गुरुजनांविषयी आदर व वचक वाटण्याचा होता. त्यामुळे संकोचत होतो. शेवटी एकदा मनाचा हिय्या करून बाईंना तासानंतर विचारलेच. "घरी या. समजावून देईन," असे त्या इतक्या प्रेमाने व मोकळेपणी म्हणाल्या की माझा बराचसा संकोच दूर झाला.

मला सर्वांत झपाटले होते 'शेजारती'ने, व तीच सर्वांत गूढ. ती कविता बाईंनी मला त्यांच्या घरी तासभर समजावून दिली. तेव्हापासून मी बाईंचा अधिक जवळचा विद्यार्थी झालो. माझ्या उनाड भिडस्तपणामुळे ही जवळीक मला तेव्हा वाढवता आली नाही. तरी मनाने मी त्यांच्यात अधिकाधिक गुंतत गेलो. बाई, आप्पा व पी. वाय. देशपांडे यांचे नवे आशय नव्या शैलीत मांडणारे काव्यात्म साहित्य प्रकाशित होताच त्यावर तुटून पडत होतो. आ. रा. व पी. वाय. या दोन अफलातून देशपांडे-जोडप्यांच्या बुद्धिप्रभ व जिवलग स्नेहाच्या सुरस कथा नागपूरच्या रुक्ष व मागास वातावरणात आम्हाला गंधर्वांच्या नवलकथांसारख्या वाटत असत.

पुढे पंधरा वर्षांनंतर दिल्लीत आप्पांचा व बाईंचा बराच सहवास लाभला. तेव्हा दिसले की आप्पा-बाईंचे सहजीवन दोन स्वतंत्र कर्तृत्वशील, कलावंत व्यक्तित्वांचे लोभस मनोमीलन होते. त्यांच्या विवाहपूर्व प्रेमाची कहाणी सांगणारा त्यांच्यातील पत्रव्यवहार घगत पेट्यांमध्ये भरलेला होता. त्या पेट्यांचा निर्देश करून ते म्हणायचे, "ह्या पेट्या आम्ही मंगेश राजाध्यक्षांच्या स्वाधीन करणार आहोत. आम्ही मेल्यावर हा पत्रव्यवहार त्यांनी प्रकाशात आणायचा." पण बहुधा बाई मेल्यावरचे रितेपण बाईंच्या स्मृतिरूप अस्तित्वाने भरून काढण्यासाठी आप्पांनी स्वतःलाच त्या पत्र-व्यवहारात गुंतवले व 'कुसुमानिल' प्रसिद्ध केले.

आप्पा व बाई दोघेही एका उंच सांस्कृतिक पातळीवरचे जीवन जगले. बाई शिस्तशीर व मर्यादशील तर आप्पा वऱ्हाडी बाण्याचे ऐसपैस व अघळपघळ एवढाच दोघांच्या वागण्यात फरक. त्यांच्या थट्टा-विनोदालाहि एक विदग्ध मूस होती. पी. वाय सारख्या जुन्या दोस्तांशी आप्पांचे संभाषण अनेकदा गमतीने "गा गा रावळव्यासा, एक् गावू असे. तयाची वार्ता काय पुसिजे" अशा महानुभावी बोलीत चालत असे. जीवनातील रस व सौंदर्य निकोप वृत्तीने अनुभवण्यात दोघेही लुब्ध. दोघांनाही चित्र-कलेची फार आवड. मागे डेहराडूनचा एक महाराष्ट्रीय चित्रकार नागपूरला मौंट हॉटेलमध्ये येऊन राहिला होता. तेव्हा कुसुमावतीबाई व विमलाबाई (पी. वाय. च्या सुविद्य व कर्तबगार पत्नी) नेहमी त्याच्याकडे जाऊन बसत असत. दिल्लीला एक

युरोपीय ( बहुधा डच ) महिला चित्रकार जोगिणीसारखी राहात होती—अजून असावी. तिच्या चित्रांनी आप्पा फार प्रभावित झाले होते. विशेष म्हणजे तिची चित्रे आध्यात्मिक अनुभूतीची असत. एकदा आप्पा मला म्हणाले, " तिची चित्रे जरूर पहा. तुम्हाला आवडतील." म्हणून मग मीही त्या बाईंकडे आप्पांचे नाव सांगून चित्रे पाहायला गेलो होतो.

व्यवहारात आप्पा फार व्यवहारी होते असे मानायला भरपूर जागा आहे. खुर्चींचा त्यांना लोभ आहे असे प्रवाद अनेकदा कानांवर येत. अलीकडे विदर्भ साहित्य संघातील त्यांच्या कारकीर्दींत त्यांच्यावर टीकेचा धुरळा बराच उडला. पण साहित्यात त्यांची ऋजुता निरपवाद होती. त्यांची साहित्यिक निष्ठा निर्मळ होती. आणि त्यांच्या भावजीवनात ते फार शांत व सोशिक होते. त्यांच्या राजसत्तेला उदात्ताची झळाळती किनार होती. म्हणूनच आयुष्यातील दुःखेही त्यांनी विरक्त वृत्तीने पचवली. त्यांचा मोठा मुलगा किशोर वैमानिक असताना विमान-अपघातात ठार झाला तेव्हा तो दुःखाचा डोह या जोडप्याने जगाला दिसू न देता पिऊन टाकला. ग्वाल्हेरच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद आपल्या विचार-प्रभावाने गाजवून दिल्लीला परतल्यावर थोड्याच दिवसात कुसुमावतीबाई आप्पांना एकटे सोडून गेल्या. बाईंचा अग्निसंस्कार करण्या-साठी स्मशानात आम्ही सारे जमलो होतो. आप्पा शांत बसून होते. तेव्हाही पानाचा डबा जवळ होता. घोळक्यात लोकांशी नेहमीप्रमाणेच बोलत होते. ते बोलणे नेहमीसारखे गमतीदार नव्हते इतकेच. बाईंच्या आजाराबद्दल अलिप्तपणे सांगत होते. काही आठवणी येत होत्या. काही इकडचे-तिकडचे बोलत होते. सगळे संस्कार त्यांनी निमूटपणे केले. बाईंची चिता पेटत असतानाही त्यांच्या डोळ्यात आसू नाही की उसासा नाही. पाणी भरलेले मडके खांद्यावर घेऊन, त्यातून गळणाऱ्या धारेने त्यांनी सात फेऱ्यांत बाईंना अर्घ्य दिले आणि त्याच धारेत स्वतः भिजले. रिकामे झालेले मडके निर्विकारपणे फोडून टाकले.

ही निवृत्ती आप्पांची जन्माचीच सोबती असावी. म्हणूनच प्रियजनांचा चिरवियोग त्यांना बाधला नाही. " अजून यौवनात मी " अशा प्रफुल्ल मनाने जीवन भोगणारा हा कवी अंतरात सतत घोकत होता—' येणार खास मी तुझ्याकडे, जरि जीव इथे अडकून पडे ' तो ' परि ' म्हणत नव्हता, ' जरि ' म्हणत होता, मुला-फुलात हसत-हसवीत जगत असतानाच ' विकासलेच ब्रह्म हे. न जीव बंधनात मी. नसे मुमुक्षु-मुक्त मी ' असा प्रत्यय त्याला येत होता. ' एक असे आहे, एकटेच नाही ' हे त्याला दिसत होते आणि ' होतसे दर्शन, न होता दर्शन ' अशी त्याची उलटी खूण त्याला पटत होती.

आप्पांच्या कवितेत दिसून येणारा हा परतत्त्वाचा स्पर्श केवळ कवि-कल्पना नव्हती. ते त्यांचे साक्षात होते. आयुष्याच्या शेवटी ' दशपदी 'तच फक्त त्यांना अध्यात्माचा

अनुक्रमणिका

ध्यास लागला नव्हता. तरुणपणातील ‘ फुलवाती’चे गूढगुंजनही त्याचेच स्वप्निल गर्भरूप होते. ‘ पेतें व्हा ’ मध्ये ते बहरले होते व ‘ दशपदी’त फळ धरू लागले होते. एकदा ते मला म्हणाले होते, “ तुम्ही इतका व्यायाम कशाला करता ? मी तुम्हाला एक सोपा व्यायाम सांगतो.” आणि त्यांनी मला प्राणशक्ती टाळूपासून पायाच्या आंगठ्यापर्यंत खेळवण्याची एक साधी क्रिया सांगितली. ही क्रिया ते स्वतः नित्य करत असत. प्रवासातही पडल्या पडल्या ती करता येते. योगनिद्रा ह्या संजीवक क्रियेचे प्राथमिक रूप असलेली तथापि ती योगविद्येतील एक शास्त्रपूत क्रिया असल्याचे अलीकडेच माझ्या वाचनात आले.

एकदा ते मला सांगत होते, “ मी वाशीमच्या डाक बंगल्यात बाहेर खुर्ची टाकून बसला असायचा. रम्य ठिकाण होतं.” तेव्हा ते वऱ्हाडात न्यायाधीश म्हणून नोकरी करत होते. ‘ फुलवाती ’—नंतरचा हा काळ असावा. “ समोर छान झाडी होती. पाहता पाहता मनाचा लय लागायचा आणि मग कानात घणाघणा घंटांचा नाद घुमायचा. कधी जोराजोरात शंख वाजायचे. अगदी कानटळ्या बसायच्या. भानावर येऊन मी मनात म्हणायचा—‘ अरे धुत् ही काह्याची पीडा आपल्यामागे लागली. आपल्याला नको हे ’ मग तिथून उठून कोणाशी तरी गप्पा मारायला जायचा.”

अनाहताचा हा अनाहूत अनुभव आप्पांनी झिडकारला होता तो ‘ भरीत रंग बैठकीत, स्नेह-सोबतीत मी. प्रियेस प्रेम होत मी ’ असे जिते जागते रसज्ञ जीवन जगण्यासाठी. पण त्या अनाहतामागच्या अज्ञाताने त्यांचे बोट कधी सोडले नाही. म्हणूनच त्यांना ‘ प्रीत तुझी-माझी नाही निराळेपणाची. जगातल्या सुखदुःखी मिळाले-पणाची ’ असे उदात्त प्रीति-जीवन जगता आले. तो अज्ञात त्यांना अज्ञात नव्हता, ज्ञात होता. कधी जाणवला, कधी जाणवला नाही. जाणवला तेव्हा तो भास नव्हता, अनुभूती होती. ती अनुभूति येई तेव्हा ‘ अंधाराचे सरी सरावले डोळे. प्रकाशी आंधळे झाले आता ’ अशी त्याची अवस्था होई. तो प्रकाश पाहण्यासाठी हे डोळे असमर्थ होते; म्हणून तो प्रकाश पाहू शकणाऱ्या दुसऱ्या डोळ्यांसाठी ते शेवटी तळमळत होते—‘ दिपले हे नेत्र. प्रकाशाची सृष्टी पाहण्यास दृष्टी मागतात. ’ ही नवी दृष्टी मागण्यासाठी आप्पा आता देवाकडे गेले आहेत.

■

# बुकवाल्डचा विनोद



**सुभाष भेण्डे**

आर्ट बुकवाल्ड या अमेरिकन विनोदकाराला नुकतंच 'पुलीत्झर पारितोषिक' मिळालं. अशा प्रकारच्या अनेक पारितोषिकांचा मानकरी व्हावं अशाच दर्जाचं त्याचं लेखन आहे. गेली अनेक वर्षं बुकवाल्ड आपल्या प्रसन्न विनोदी लेखनानं वाचकांचं मन रिझवीत आहे. त्याचा असा एक वेगळा वाचकवर्ग निर्माण झाला आहे. 'उपरोधपूर्ण लेखन करणारा पोप आणि स्विफ्ट यानंतरचा तो इंग्रजीतला सर्वांत मोठा लेखक' अशी त्याची भलावण वड्यावड्या समीक्षकांनी केली आहे.

बुकवाल्डच्या लेखनाची जात अगदी वेगळी आहे. मार्क ट्वेन, स्टीफन लीकॉक, वुडहाऊस यांचं लेखन ज्यांनी वाचलं असेल त्यांना बुकवाल्डच्या विनोदाचा प्रकार निराळा आहे हे चट्दिशी लक्षात येईल. बुकवाल्ड पाल्हाळ लावत नाही. छोटे छोटे, दोन अडीच पानं लेख लिहिणं त्याला आवडतं. रशिया-पोलंड आदी देशांची त्यानं लिहिलेली चटकदार प्रवासवर्णनं त्यामानानं दीर्घ आहेत. आठवड्यातून तीन वेळा नियमित सदर लिहिण्याचं व्रत घेतलं असल्यानं छोटे छोटे प्रसंग खुलवून नेमक्या मुद्द्यावर बोट ठेवण्यावर त्याचा अधिक भर असतो. राजकारणातल्या व्यक्तींच्या ढोंगबाजीवर, त्यांच्या वागण्याबोलण्यातील विसंगतीवर तो मिस्किलपणे सौम्य प्रहार करत असतो. टाईम्स ऑफ इंडियामध्ये 'यू सेड इट' व्यंगचित्रं काढणाऱ्या आर. के. लक्ष्मण आणि बुकवाल्ड यांची जातकुळी एकच. लक्ष्मण जे व्यंगचित्राद्वारे व एखाद्या वाक्याद्वारे सांगू पाहतो ते सारं बुकवाल्ड छोट्या लेखाद्वारे व्यक्त करतो.

दैनंदिन जीवनातल्या हरघडी घडणाऱ्या प्रसंगांतून बुकवाल्डचा विनोद फुलतो. केवळ चार तास आणि तोही एकाच चॅनेलवर चालणारा टी. व्ही. मुंबईत असूनही मुंबई व आसपासच्या गावांत राहणारे लेखक त्या 'इडियट बॉक्स'च्या किती आहारी

अनुक्रमणिका

गेले आहेत हे सांगायला नकोच. अमेरिकेत तर सकाळी सहापासून मध्यरात्री एक-दोन वाजेपर्यंत टी. व्ही. चा धूमधडाका चालू असतो. चॅनेल्स एकूण अठ्ठावीस ! म्हणजे मग बंदी करायलाच नको ! 'छायागीता'सारखे कार्यक्रम कुठल्या ना कुठल्या तरी चॅनेलवर सतत चालू असतात. घरातले आबालवृद्ध टी. व्ही. समोरच्या जागेला चिकटून असतात. ब्रेकफास्ट, लंच, सपर सगळं तिथंच !

बुकवाल्डनं टी. व्ही. वेडावर छोटी पण चमकदार कथा लिहिली आहे. टी. व्ही. च्या दुष्परिणामावर एक प्रबंध लिहून जे साधलं नसतं ते त्यानं या छोट्या कथेत साधलं आहे.

एक दिवस अमेरिकेत टी. व्ही. अचानक बंद पडतो आणि टी. व्ही. समोर समाधी लावून बसलेला कुटुंबप्रमुख खडबडून जागा होतो, भानावर येतो. आता करायचं काय ? लांबलचक आळस देऊन तो पलीकडे बसलेल्या बायकोकडे पाहतो. मागं खुर्चीवर बसलेल्या पंधरा-सोळा वर्षांच्या मुलीकडे त्याचं लक्ष जातं. तो बायकोला विचारतो–' ही कोण मुलगी ? '

बायको करवादते ' म्हंजे काय ? ही आपली जेन नव्हे का ? '

' अरेच्चा ! जेन होय ? एवढी मोठी झाली ? तिला चार वर्षांपूर्वी पाहिली होती मी ! आत गिटार कोण वाजवतोय् ? '

' अहो–आपला हॅरी ! '

' हॅरी ? ते चार वर्षांचं कार्टं ? ते काय गिटार वाजवणार ? '

' अहो तो आता नऊ वर्षांचा झालाय–! '

' आय् सी ! तुझं सध्या काय चाललंय् ? '

' माझं ना ? मी आता बँकेत नोकरीला आहे–'

' बँकेत ? तू कॉलेजमध्ये होतीस ना लेक्चरर म्हणून ? '

' काय बाई तुमचं ! ती नोकरी सोडून अडीच वर्षं झाली ! '

असेच चालू असतं. मग कुटुंबप्रमुख म्हणतो–

' अधूनमधून टी. व्ही. बंद पडतो हे बरं आहे ! कुटुंबातल्या मंडळींची एकमेकांशी ओळख दृढ व्हायला ते आवश्यक आहे ! '

पाश्चात्त्य देशांत बोकाळलेल्या टी. व्ही. वेडावर आणखी विदारक टीका कशाला हवी ?

जागेचा जास्तीत जास्त उपयोग करून कंपनीचा फायदा वाढविण्याचं नवं शास्त्र ' ह्युमन इंजिनियरिंग ' आधुनिक जगात अधिकाधिक मान्यता पावत आहे. अशा तऱ्हेच्या तंत्रज्ञानावर बुकवाल्डनं सुरेख कोरडे ओढले आहेत.

न्यूयॉर्क ते वॉशिंग्टन विमानानं प्रवास करीत असताना बुकवाल्डला एक माणूस जवळ बसून विमानाच्या अंतर्भागाची मापं घेत असलेला दिसला.

'काय चाललंय् तुमचं?' बुकवाल्डनं विचारलं.

'पाच पाच सीट्स दोन्ही बाजूला आहेत. मध्ये जागा मोकळी सोडली आहे- तशी जागा कशाला हवी? पाच पाच सीट्सऐवजी सहा सहा सीट्स टाकता येतील–'

'असं?'

'आणि तुम्ही मागं चांगले रेलून बसलाय! ताठ बसलात तर काय बिघडतं?'

'रेलून बसतो तर तुमचं तरी काय बिघडतं?'

'तेवढी जागा विनाकारण फुकट जात नाही का? आणखी सीट्स वाढवता येतील! तुमचे गुडघे आणि समोरची सीट यांत किती अंतर आहे?'

'असेल दोन इंच!'

'जागेचा हा अपव्यय आहे! सीट्स एकमेकांना चिकटून ठेवल्या तर आणखी प्रवासी जाऊ शकतील!'

'मग ती वरची सामान ठेवायची जागा तरी फुकट का घालवता?' बुकवाल्डनं उपरोधपूर्ण आवाजात विचारलं.

पण आवाजातलं छद्म कळलं असतं तर तो इंजिनियर कशाला झाला असता? विचार करीत तो उत्तरला–'तुम्ही म्हणता त्यात तथ्य आहे! उतारूंनी बसलं पाहिजे असं कुठं आहे? काही उतारू आडवे पडून जाऊ शकतील!'

'आता झालं समाधान? की आणखी कुठं मोकळी जागा अजून शिल्लक आहे?'

'आहे तर!' आणि तंत्रज्ञ हावरेपणानं 'टॉयलेट' कडे पाहू लागला!

मुलांच्या शाळेतलं नाटक. त्या नाटकात आपल्या मुलाची वा मुलीची भूमिका असली म्हणजे केवढ्या कौतुकाचा भाग! पालक सगळं काम सोडून त्या नाटकाला हजर राहतात आणि डोळ्यात प्राण आणून रंगभूमीवरील आपल्या बाल्याचं कर्तृत्व पाहतात.

बुकवाल्डवर एकदा ही आपत्ती कोसळली. आपत्ती या अर्थानं की नाताळनिमित्त शाळेत होणाऱ्या नाटकात त्याच्या मित्राच्या मुलीनं भूमिका केली होती. आणि मित्रासाठी त्याला पहाटेपर्यंत बसून ती पहावी लागली.

मुलगी आठवीत. रात्री साडेनऊला के. जी. पासून प्रत्येक वर्गानं दहा-पंधरा मिनिटांचे नाट्यप्रयोग सादर करावयास प्रारंभ केला. पहिली दुसरी तिसरी करता करता मध्यरात्र उलटून गेली. आपल्या मित्राची मुलगी आठवीत असण्याऐवजी पहिलीदुसरीत असायला हवी होती असं बुकवाल्डला मनापासून वाटत होतं! सातवीपर्यंत वर्गात जी मुलं होती त्यांचे पालक आपापल्या मुलांना, घेऊन गेले. हॉलमध्ये शुकशुकाट झाला. शेवटी एकदाचं आठवीचं नाटक सुरू झालं! 'राजकन्या आणि पऱ्या' राजकन्येनं एका परीला विचारलं 'तुला काय व्हावंसं वाटतं?'

ती परी उत्तरली 'सर्वांत सुंदर परी व्हावं असं वाटतं!'

अनुक्रमणिका

मित्र म्हणाला, ' पाहिलीस माझी मुलगी उर्सुला ? किती छान उत्तर दिलं नाही ? प्रयोग सुरू होईपर्यंत माझ्या मनावर इतका ताण होता ! म्हटलं सगळं नीट निभेल ना ?'

' मग ? झालं तुझ्या मुलीचं काम ? '

' अर्थात ! '

' बापरे ! या एका वाक्यासाठी आपण चारपाच तास थांबलो ? '

' एका वाक्यासाठी ? मागल्या वर्षी उर्सुलानं नाटकात घंटेचं काम केलं होतं. सबंध प्रयोगात ती एकदाच ओरडली – ' बॅंग ! ' त्यासाठी मी साडेचार तास तिष्ठत बसलो होतो महाराज ! तू भाग्यवान आहेस ! एक संपूर्ण वाक्य म्हणजे काय चेष्टा आहे ? '
' भाग्यवान आहे खरा ! ' बुकवाल्ड मान हलवीत उत्तरला.

बिचारा आणखी काय म्हणणार ?

अमेरिकेत समाजात विवाहसंस्थेचं काय झालंय हे जगजाहीर आहे ! घटस्फोट, पुन्हा पुन्हा विवाह हा क्रम सारखा चालू असतो. ' त्याचं तिसर, तिचं चौथं ' अशा लग्नाच्या जाहिराती रोजच वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत असतात.

बुकवाल्डचं म्हणणं असं की, नाताळनिमित्त येणाऱ्या शुभेच्छा कार्डावरून अमेरिकन समाजाचं जे दर्शन घडतं ते मोठं अस्वस्थ करणारं असतं.

एक दिवस सौ. बुकवाल्ड नवऱ्याला म्हणाली, ' हे पाहिलंत का ग्रिटिंग कार्ड ? हॅन्स आणि व्हर्जिनिया लार्ककडून आलंय ! पण हॅन्सच्या बायकोचं नाव फ्रेडा ना ? '

' हो ना ! तिनं आपलं नाव बदललं की काय ? फ्रेडाचं व्हर्जिनिया केलं की काय ? '

पण दुसरे दिवशी उलगडा झाला.

' हे कार्ड मॅक्डोवलकडून आलंय. पण आपल्या माहितीचा कुणी मॅक्डोवल आहे ? ' बायकोनं विचारलं.

' नाही ! पण मग उगाच कोण आपल्याला, ग्रिटिंग पाठवील ? ' बुकवाल्डनं शंका व्यक्त केली.

' अग ही तुझी मैत्रीण फ्रेडा लार्क ! आता मॅक्डोवल झालीय ! '

' हा फोटो मायनी टटलचा दिसतोय. पण खाली लिहिलंय लिंड स्टॉम्सकडून. '

' ही मुलं मायनीचीच बरं का ! मग डिक टटलचं काय झालं ? '

' हा पहा डिकचा फोटो. त्याच्याजवळ बसलेली मुलं त्याची दिसत नाहीत ! '

' ती त्याच्या नव्या बायकोची असतील ! '

' चला बरं झालं ! डिक टटलचा प्रश्न सुटला ! '

अशाच प्रकारे आणखी काही प्रश्न सुटले !

सौ. बुकवल्ड हर्षभरित होऊन म्हणाल्या, ' बाकीचं सोडा. मॅडिसन्स अजून एकत्र राहिलेली दिसतात–त्यांच्याकडून आलेलं हे कार्ड पहा. दोघांच्या सह्या आहेत. '

' ते विसर ! ' बुकवाल्डनं सांगितलं.–आताच मला बिल मॅडिनकडून ऑफिसात

तार आलीय. नाताळ शुभेच्छा कार्ड नव्यानं पाठवीत आहे. आधीचं कार्ड फेकून देणे!'

तर अशी ही नवनवोन्मेषशालिनी अमेरिकन कुटुंबसंस्था!

अमेरिकेत नोकऱ्या मिळवणं सोपं आहे म्हणता? बिलकूल नाही! व्हिएटनाम युद्ध सुरू असताना पूर्ण रोजगारी होती. पण युद्ध बंद झाल्यावर बेकारी वाढली न्यूक्लिअर फिजिक्समध्ये पारंगत असलेल्या, संशोधनाची आवड असलेल्या एका पीएच्. डी. विद्यार्थ्याला शेवटी ट्रक ड्रायव्हरची नोकरी कशी करावी लागते याचा मनोरंजक किस्सा बुकवाल्डनं सांगितला आहे. पत्ररूपानं लिहिलेली ही छोटेखानी कथा मुळातून वाचण्यासारखी आहे.

तर असं हे बुकवाल्डचं मनोरंजक, हवंहवंसं वाटणारं विश्व, बुकवाल्डच्या शेकडो कथांचं मराठीत भाषांतर झालं तर अत्याधुनिक अमेरिकन समाजातील खाचखळगे, सुखदुःखं, सामर्थ्य-मर्यादा सर्वसाधारण वाचकांना जवळून समजतील. अमेरिकेतील कॉम्प्युटरच्या प्रभावाखालील औद्योगिक जीवन, तिथले मानसिक आजाराचे प्रकार तरुणतरुणींचं जग, कॉलेज जीवन, सिनेमा, टी. व्ही., वृत्तपत्र यांचं क्षेत्र यांमधील बारीकसारीक वैशिष्ट्यं मराठी वाचकांना उमजून येतील. आणि तीही दिलखुलास, हलक्या फुलक्या पद्धतीनं. बुकवाल्डनं अमेरिकेतील राजकीय पुढाऱ्यांची केलेली थट्टामस्करी अमेरिकेत सहज खपून जाईल अशा पद्धतीची आहे. कुठल्याही प्रकारची कृत्रिम बंधनं न मानणारा तो लोकशाही देश सर्व प्रकारची चेष्टा पचवू शकतो बुकवाल्डप्रमाणं आपल्याकडे कुणी राजकारणावर व राजकीय नेत्यांवर टीका टिप्पणी केली तर त्याला कुणाकुणाच्या रोषाला नि अब्रुनुकसान-फिर्यादीला तोंड द्यावं लागेल याची कल्पनाच केलेली बरी!

■

वाङ्मयचर्चा :

## ‘दलित साहित्य : आधुनिक लोकसाहित्य !’

ॐ

स. शि. भावे

आजकाल दलित साहित्यासंबंधी दोन दृष्टिकोण प्रामुख्याने मांडले जात आहेत.

एक म्हणजे जो जन्माने दलित आहे त्यालाच खरे दलित साहित्य निर्माण करता येईल. दलितत्वाची व्यथा आणि वेदना जन्मनिष्ठ आहे. कल्पना कितीही ताणली तरी या जन्मनिष्ठ, आणि म्हणून जातिनिष्ठ, वेदनेची अनुभूती येणे शक्य नाही. जन्मनिष्ठ दलितत्वाच्या अनुभूतीतून आजच्या तरुण दलितांत विद्रोह निर्माण होणार. हा जातिनिष्ठ विद्रोह हे दलित साहित्यात व्यक्त होणाऱ्या अनुभूतीचे व्यवच्छेदक लक्षण आहे.

दुसरा दृष्टिकोण असा, की नव्याने उफाळून वर येणाऱ्या या साहित्याचे मूल्यमापन इतक्यात करू नये. ती एक प्रकारची घाई होईल. जातिविशिष्ट सामूहिक विद्रोहाचा हा उद्रेक गेली दहा वर्षे उफाळतो आहे. येती दहाएक वर्षे हा विद्रोह उफाळत राहील. या प्रातिनिधिक उद्रेकात जसे श्रेष्ठ तसेच सामान्य साहित्यही लिहिले जाईल. पण साहित्यमूल्यांच्या आधारे अशी चिकित्सा करण्याची वेळ आजची नव्हे. आज तशी चिकित्सा केली तर एखादे वेळी काही उद्रेक तरी हिरमुसतील, गप्प होतील. तेव्हा आज अशी चिकित्सा करू नये. स्वागतशीलतेने सारे उद्रेक बाहेर येऊ नये. समीक्षेला काही काळ थांबता येईल. अशा थांबण्याने समीक्षेचे काही नुकसान होणारे नाही.

हे दोन्ही दृष्टिकोण समजून घ्यावे असेच आहेत. तथापि, हे मान्य झाल्याने समीक्षेची जबाबदारी संपते असे म्हणता येणार नाही. मूल्यमापन करणे तूर्त स्थगित केले





तरी दलित साहित्याचे नेमके रूप कोणते हे जाणण्याची व निश्चित करण्याची जबाबदारी समीक्षेने टाळणे बरोबर होणार नाही. प्राथमिक आकलनाची व शक्यतर स्थूल वर्गीकरणाची जबाबदारी समीक्षेवर असते. या जाणिवेने आकलनाची एक दिशा चर्चेसाठी खाली सुचवीत आहे. दलित साहित्याच्या अनेक परिसंवादांत, गेल्या काही वर्षांत, वेळोवेळी ही दिशा मांडली होती. म. सा. पत्रिकेच्या व्यासपीठावर या भूमिके-बाबत चर्चा व्हावी, हा प्रस्तुत छोट्या लेखाचा उद्देश आहे.

भूमिका अशी की, **आधुनिक लिखित लोकसाहित्य** असे आजच्या दलित साहित्याचे रूप आहे.

या साहित्यात व्यक्त झालेली व होणारी अनुभूती व्यक्तिसापेक्ष नसून प्रातिनिधिक आहे. विशिष्ट समाजाची आंतरिक वेदना या साहित्यात व्यक्त होत आहे. हे प्राति-निधिकत्व नीट लक्षात घेतले, म्हणजे तोचतोपणाचा घेतला जाणारा आक्षेप चुकीच्या भूमिकेतून घेतला जात आहे हे सहज स्पष्ट होईल. आणि **प्रातिनिधिकतेच्या व सामू-हिकतेच्या** लक्षणांनी, हे आधुनिक व्यक्तिविशिष्ट साहित्य नव्हे, ते लोक-साहित्य आहे, हेही स्पष्ट होईल.

आजवरची लोकसाहित्याची रचना मौखिक होती. दलित साहित्य लिहिले जात आहे. हा केवळ परिस्थितीचा फरक आहे. मुद्रण, नियतकालिके, अशी आजची स्थिती पूर्वी असती तर पूर्वीचे लोकसाहित्यही प्रसिद्ध होऊ शकले असते. आज जशी त्या त्या कवी-लेखकांची नावे प्रसिद्ध होतात, तशी त्या वेळची नावे प्रसिद्ध झाली असती. नाहीतरी, लोकनाट्याच्या आविष्काराची मदत मिळाल्याने, कवि-शाहीरांची नावे अठराव्या–एकोणिसाव्या शतकात गाजलीच. नावे वेगळी, कवने वेगळी पण शाहिरी वाङ्मयात अनुभूतीचे प्रातिनिधिकत्व होते. त्या दृष्टीने शाहिरी वाङ्मय हाही मराठी लोक-साहित्य-परंपरेचा भाग म्हणावा लागेल. आजचे दलित साहित्यही लिखित असले, वेगळ्या कवी–लेखकांची नावे त्याखाली असली तरी अनुभूतीच्या दृष्टीने लोकवाङ्मयच आहे.

या लोकसाहित्याला वर ' आधुनिक ' म्हटले ते साभिप्राय म्हटले आहे. आजचा जातिनिष्ठ विद्रोह आधुनिक क्रांतितत्त्वज्ञानातून आला आहे. त्या केवळ यातनांच्या किंकाळ्या नाहीत. नव्या तत्त्वज्ञानाच्या भक्कम आधाराने ही अनुभूती आधुनिक झाली आहे.

**एवंच, आधुनिक, लिखित लोकसाहित्य** असे आजच्या साहित्याचे वर्णन समीक्षेला करता येईल. या साहित्याच्या साहित्यिक मूल्यमापनाची योग्य दिशा या वर्णनात अनुस्यूत आहे हे स्पष्ट होण्यासही हरकत नसावी.

■

अनुक्रमणिका

# समर्थांच्या शिकवणीतील वेगळीक

स. गं. मालशे

## रामदास आणि अन्य संत

महाराष्ट्राच्या संस्कृतीचे आणि भाषेचे फार मोठे वैभव म्हणजे मराठी संतकाव्य. या काव्याची निर्मिती मध्ययुगाच्या काळात झाली. त्या काळी मानवी जीविताचे ध्येय वा अंतिम फलित काय, याविषयी आजच्याप्रमाणे वाद नव्हता. ते ध्येय वा फलित एका शब्दात सांगायचे तर 'मोक्ष' असे सांगता येईल. या बाबतीत त्याकाळी कसली मतमतांतरे नव्हती. पण मोक्षाधिकार मात्र फक्त त्रैवर्णिकांनाच होता; स्त्रीशूद्रांना त्यापासून वंचित राखले जात होते. संतांच्या भक्तिसंप्रदायाने स्त्रीशूद्रांची ही कुचंबणा जाणली व त्यांना मोक्षाची दारे खुली केली. प्रा. श्री. म. माटयांच्या भाषेत सांगायचे तर 'पारमार्थिक लोकशाही' स्थापन केली. अगदी नेमके सांगायचे, तर परमार्थापुरती लोकशाही प्रस्थापित केली. अशी सीमित जातिभेदातीतता आणि लिंगभेदातीतता हे या भक्तिसंप्रदायाचे एक फार मोठे वैशिष्ट्य. दुसरे असे की, निदान वारकरी संप्रदायाने तरी आपली शिकवण वैदिक परंपरेला, गीतोपनिषदांना धरूनच आहे, ती शांकरमताधिष्ठित अद्वैतीच आहे, असा पवित्रा घेतलेला होता. यात भक्ती आणि ज्ञान यांचा मेळ घालण्याचा जसा प्रयत्न दिसतो, तसाच आपली शिकवण मुख्य परंपरेच्या प्रवाहाहून वेगळी नाही, हे दर्शविण्याचाही रोख दिसतो. संत रामदासांचा संप्रदाय वारकरी संप्रदायाहून वेगळा मानला जातो, तरीपण या बाबतीतली त्यांची भूमिका फारशी निराळी नाही.

साधू दिसती वेगळाले। परी ते स्वरूपीं मिळाले
मिळोनियां एकचि झाले। देहातीत वस्तू (दा. ७·२·३१)

अनुक्रमणिका

हे समर्थांचे वचन एकंदरीत सार्थच आहे.

### सगुणनिर्गुण विचार

काही अभ्यासक रामदास आणि वामनपंडित यांना सगुणोपासक मानतात, पण रामदास आणि इतर संत यांच्यामध्ये सगुणनिर्गुणविचाराबद्दल एकमतच आहे. निर्गुण भक्ती हे अंतिम साध्य असले तरी जनसामान्यांची मने निर्गुणावर एकदम ठरत नाहीत. तेव्हा संतांनी एक पायरी म्हणून सगुण भक्तीला मान्यताच दिली. शिवाय संतांची भक्ती कर्मकांडी नव्हती. कीर्तन, नामस्मरण या स्वरूपाची सुलभसोपारी भक्ती होती. आणखी एक वैशिष्ट्य असे की, सगुण भक्तीला पायरी म्हणून मान्यता देत असताही हरिहरांत भेद नाही, हेच तत्त्व त्यांनी सतत बिंबवले आहे. त्यामुळे मराठी समाज देवतावारीने फारसा विभागला गेला नाही. तुकोबा कोटिक्रम लढवतात—

हरिहरा भेद नाहीं। करू नये वाद
...भेदकासी नाड। एक वेलांटीच आड ( सरकारी गाथा, १२४ )

रामदासांच्या 'दासबोधां'त तसेच काही स्फुट प्रकरणांत नवविधाभक्ती आणि सगुणोपासना यांचे विस्ताराने वर्णन आले असले, 'संशयपंचका'त कुलदैवतांची लांबलचक जंत्री दिलेली असली आणि विविध देवतांच्या आरत्याही त्यांनी रचलेल्या असल्या, तरी त्यांना बहुदैवतवाद मान्य नव्हता :

देव जाले उदंड। देवांचें मांडले भंड
भूतदेवतांचे थोतांड। येकचि जालें ( दा. ११.२.२० )

असा परखड निषेध त्यांनी नोंदवला असून

सकळ देवांचें मूळ। तो हा अंतरात्माचि केवळ।
भूमंडळीं भोग सकळ। त्यासीच घडे
नाना देव होऊनि बैसला। नाना शक्तिरूपें जाला
भोक्ता सकळ वैभवाला। तोचि येक ( दा. १८.२.१६–१७ )

असा सिद्धांत समर्थांनी स्पष्टपणे सांगितला आहे. मूर्तीमध्ये खरा देव नाही, हे त्यांनी परोपरीने स्पष्ट केले आहे.

नर्मदागंडिकातीरीं देव पडले लक्षवरी
त्यांची संख्या कोण करी। असंख्यात गोटे ( दा. ६.६.३८ )
धातु पाषाण मृत्तिका। चित्र लेप काष्ठ देखा
तेथे देव कैंचा मूर्खा। भ्रांति पडली ( दा. ६ ६ ४० )
देवें निर्मिली हे क्षिती। तिचे पोटीं पाषाण होती
तयासचि देव म्हणती। विवेकहीन ( दा. ८.१.२९ )

तरीसुद्धा मूर्तिपूजेविरुद्ध अन्य वारकरी संतांचा काय किंवा समर्थांचा काय, कडवा कटाक्ष नाही.

'नातुडे मुख्य परमात्मा म्हणोनि करावी लागे प्रतिमा' (दा.१.४.६)

अशी त्यांची रास्त व समन्वयी भूमिका होती.

## स्त्रीशूद्रविषयक व्यापक सहानुभूती

पारमार्थिक क्षेत्रातील अद्वैताधिष्ठित व्यापक सहानुभूतीचा मराठी संतांचा वारसा रामदासांनीही पुढे चालविलेला दिसून येतो. तदनुसार ते म्हणतात :

पृथ्वीमध्यें जितुकीं शरीरें। तितुकीं भगवंताची घरें (दा. २०.४.४)
ब्राह्मणाचें ब्रह्म सोवळें। शूद्राचें तें वोवळें
असें वेगळें आगळें। असेचिना (दा. ७.२.२५)

याच दृष्टिकोणातून स्मरणभक्तीचा महिमा गाताना ते सांगतात :

नाम स्मरे निरंतर। तें जाणावें पुण्य शरीर (दा. ४.३.२२)
चहू वर्णा नामाधिकार। नामीं नाहीं लहानथोर (दा. ४.३.२४)

'भजन' या करुणाष्टकात

भेटो कोणी येक नर। धेड माहार चांभार
त्याचें राखावें अंतर। याचें नाव भजन

अशी मुळी व्याख्याच केलेली आहे.

या उदार भूमिकेमुळे परमार्थाच्या दालनाचे रुद्ध द्वार खुले झाले असले आणि जातिभेदाचा काच काही अंशी ढिला झाला असला, तरी लोकव्यवहारातील भेदाभेद लोप पावले होते, असे मानता येत नाही. या गोष्टीचा पडताळा अन्य संतांच्या साहित्या-प्रमाणे रामदासांच्या साहित्यातही येतो. तुकोबांप्रमाणे ब्राह्मण भ्रष्ट झाला तरी तो त्यांनी श्रेष्ठ मानला आहे. अन्य संतांप्रमाणे कलियुगवर्णनात त्यांनी वर्णसंकराचा निषेध केलेला आहे. नीच जातीचा गुरू करण्याविरुद्ध त्यांचा किती कटाक्ष होता, हे

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले
गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्यांचे (दा. १४-८-३१)

येथपासून पुढील नऊदहा ओव्या वाचाव्या. महंतांना शिकवणीचे तंत्र विशद करताना त्यांनी म्हटले आहे.

अंतर येक तों खरें। परी सांगातें घेऊं न येती माहारें
पंडित आणि चाटीं पोरें। येक कैंसीं (दा. १३-१०-१३)

संतचळवळीतून घडून आलेल्या भेदाभेदनिरसनाला अशी कालसापेक्ष मर्यादा होती; आणि ती रामदासांमध्ये ठळकपणे आढळून येते.

### स्त्रीविषयक उदार दृष्टिकोण

रामदासांचा स्त्रीविषयक दृष्टिकोण विशेष उदार असल्याचे दिसून येते. ' आत्माराम निरूपणा 'त स्त्रीपुरुषसमानतेचे तत्त्व सांगताना ते म्हणतातः

पुरुषाचा जीव स्त्रियांची जीवी। ऐसी नाहीं उटाटेवी ( दा. १६–८–२५ )

' आधिभौतिकता निरुपणा 'त स्त्रीला बाळपणापासून सोसाव्या लागणाऱ्या जाचाचे आणि तिच्या पराधीन जिण्याचे त्यांनी केलेले वर्णन वारकाव्याचे आहे ( दा. ३. ७. २४–२८ ).

माता आणि पत्नी म्हणून तिच्या कार्याचे महत्त्वही त्यांनी दासबोधात आणि अन्यत्र गौरवपूर्वक निर्देशिले आहे. रामदासांनी स्त्रियांना शिष्यत्व दिलेच, पण शिवाय त्यांना मठव्यवस्थापनात सहभागी करून घेतले. वेणाबाई आणि आक्काबाई या त्यांच्या शिष्या अनुक्रमे मिरज आणि चाफळ या मठांची कामे अनेक वर्षे पाहात होत्या, हे प्रसिद्धच आहे. तसेच समर्थांच्या शिष्यगणात नाना व्यवसायांचे आणि अठरा पगड जातींचे लोक होते. सारांश, अद्वैत, सगुणनिर्गुण, मूर्तिपूजा, नामस्मरण इत्यादी विचारांबाबत तसेच पारमार्थिक क्षेत्रातील वर्णभेदातीतता, व्यवसायभेदातीतता, लिंग-भेदातीतता यांबाबत अन्य मराठी संत आणि रामदास यांच्यामध्ये सामान्यतः एक-वाक्यताच आढळेल.

### वेगळेपणाच्या कोड्याचे उत्तर

मग रामदास हे अन्य संतांहून वेगळे होते असे का म्हटले जाते?
दासबोध हा त्यांचा महाग्रंथ ( Magnum opus ),

' आत्माराम दासबोध। माझे रूप स्वतःसिद्ध '

असे त्यांनीच खुद्द म्हटले आहे. या महाग्रंथाचे स्वरूप कितपत वेगळे आहे ? त्याच्या वेगळेपणाचे एकदोन पैलू सहज सांगता येतील. एक गोष्ट अशी की, दासबोध हा ग्रंथ खरोखरच ' स्वतःसिद्ध ' आहे. निरूपणाच्या अनुषंगाने गीतेतील श्लोक अधूनमधून त्यात आलेले असले, तरी तो ग्रंथ गीता किंवा भागवत अशा संस्कृत ग्रंथांवरील भाष्य नाही, त्याचे स्वरूप स्वतंत्र आहे. दुसरी गोष्ट अशी की, रामदासांच्या या महाग्रंथात वा त्यांच्या अभंगादी रचनेत योगविषयक तुरळक उल्लेख येत असले, तरी अन्य संतांप्रमाणे योगमार्गीय आत्मानुभवांचे दर्शन त्यात घडविलेले नाही. पण हे उभय पैलू शिकवणीच्या विचाराच्या दृष्टीने गौणच. रामदासांची शिकवण अन्य संतांहून त्यामुळे विशेष वेगळी मानता येईल काय ? ' येथ बोलिला विशद। भक्तिमार्ग ' ( दा. १.१.२ ) हे त्यांनी स्वतःच सांगितले नाही का ? ' सावधान ' शब्द कानी पडताच पुरश्चरणाची वाट धरणाऱ्या आणि आमरण ब्रह्मचारी राहिलेल्या या संताने

प्रपंच धुडका पेटला। मध्यें परमार्थ जळून गेला
ऐसें देखोनि तुम्हांला। कैसें वरें वाटतें ? ( जु. दा. ११·५६ )

असा प्रश्न करून त्याचे

जयास वाटे वैराग्य करावें। तेणें कांहींच न विचारावें
उठोनि वाटाचि लागावें। दिगंतराप्रती ( जु. दा. १८·२४ )

असे स्पष्ट उत्तर दिलेले नाही का ? हे सारे खरेच आहे, तर मग या कोड्याचे उत्तर काय? त्याचे उत्तर असे आहे की रामदास हे प्रथम आणि व्यक्तिशः निवृत्तिवादीच होते, पण लोकशः प्रवृत्तिवादी होते.

येथे 'मुख्य ते हरिकथा निरूपण' असले तरी—

दुसरे ते राजकारण। तिसरे तें सावधपण। सर्वविषयीं॥
चवथा अत्यंत साक्षेप' ( दा. ११.५.४–५ )

या गोष्टीही आहेत. किंबहुना असे म्हणता येईल की. 'मुख्य हरिकथा निरूपणा' साठीच बाकीच्या गोष्टींची आवश्यकता होती. काळच असा उभा ठाकला होता की निवृत्तिवाद तगून राहावयाचा तर प्रवृत्तिवादाचा हितोपदेश करणे अवश्य झाले होते.

## तत्कालीन लोकस्थिती

या काळाला आणि तत्कालीन वातावरणाला 'अस्मानी सुल्तानी' असे अन्वर्थक नाव दिले गेले आहे. या काळात एका बाजूने अतिवृष्टी-अनावृष्टीसारखी अस्मानी संकटे येत होती आणि दुसऱ्या बाजूने परचक्राचे सुल्तानीचे संकट ओढवून पक्के झाले होते. अकबरासारखी एखादी राजवट वगळल्यास या परकीय राज्यकर्त्यांच्या दरबारी धर्मांध मुल्लामौलवींचे प्रस्थ असे. कत्तली, मठमंदिरांचा विध्वंस, पोथ्यापुराणांची जाळपोळ, झिजियासारख्या कराची लादणूक नाहीतर धर्मांतरे असे प्रकार चालूच असत. उदार आणि सहिष्णू समजल्या जाणाऱ्या बहमनी राजवटीतसुद्धा अशी सुल्तानी चालूच होती. विशेषतः सुफीपंथीय मुल्लामौलवींचा धर्मप्रचार येथील धर्माच्या मुळावरच आलेला होता. शिवाय सुफी तत्त्वज्ञान हिंदूंच्या अद्वैत कल्पनेशी बरेच जुळते होते. त्यांचा भक्तिमार्ग आपल्या मधुरा भक्तीशी निकट येणारा होता. संतांच्या कार्याने आणि शिकवणीने अध्यात्मापुरतेच काय ते चातुर्वर्ण्याचे दार किलकिले झाले होते; पण जन्मजात जातिभेद व्यवहारात होता तिथेच होता. चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या पंखाखाली उच्चवर्णीय सरंजामशाहीच गुण्यागोविंदाने नांदत होती. परिणामी सर्व-सामान्य शेतकरी आणि दलित वर्ग यांच्या जीवनपद्धतीत फारसा फेर पडलेला नव्हता. हा वर्ग शतकानुशतके अज्ञानात आणि दारिद्र्यात खितपत होता. मुस्लिम धर्मात जाति-भेदाला थारा नव्हता. हिंदु समाजपद्धतीत मात्र नीच जातींना पुरेसे संरक्षण नव्हते, त्यांची सर्वस्वी उपेक्षाच होत होती, त्यांना बहिष्कृत जिणेच जगावे लागत होते.

अस्मानीचा वा दुष्काळी परिस्थितीचा तसेच राजसत्तेच्या पक्षपातीपणाचा लाभ उठवून दक्षिणेमध्ये धर्मांतरे घडून येत होती—कधीकधी तर ती स्वखुषीनेही घडत होती.

### धगधगते वास्तव

समर्थांच्या साहित्यात या वातावरणाचे पडसाद स्पष्टपणे उमटलेले आहेत. 'अस्मानी'चे किंवा दुष्काळाचे हे भेदक वर्णन पाहा :—

जन बुडाले बुडाले। पोटेवीण गेले
बहु कष्टले कष्टले। किती एक मेले
वीसा लोकांत एकची। एकची राहीले
तेणें उदंड उदंड। दुःखची साहीलें
देश नासला नासला। उठे तोची कुटी
पिकें होतांचि होतांचि। होते लुटालुटी
काळीकरितां जिवलगां। जाली तातातुटी
अवघ्या कुटुंबा कुटुंबा। होते फाटाफुटी
सुडके पटकर पटकर। न मिळे पांघराया
शक्ती नाहीं रे नाहीं रे। कोपट कराया
वाट फुटेना फुटेना। विदेश धराया
अवघे बैसलों बैसलों। बैसलों मराया
नदी भरतां भरतां। घालूनिया घेती
वीख घेऊनी घेऊनी। उदंड मरती
अग्नी लाऊनी लाऊनी। जळोनियां जाती
मोठी फजिती फजिती। सांगावें तें किती ?
येक पळाले पळाले। दूर देशा गेले
बहु कष्टले कष्टले। तेथे नागवले
फिरोनि आले रे आले रे। घरिंचे लोक मेले
कोठें उपाय दिसेना। कासावीस जाले
उदंड चाकरी चाकरी। मीळेना भाकरी
लोक निलंड निलंड। काढूनि नेती पोरी
न्याय बुडाला बुडाला। जाहाली शिजोंरी
पैक्याकारणें कारणें। होते मारामारी
येतो पाहुणा पाहुणा। लौंकरी जाईना
अन्न खातो रे खातो रे। थोडेही खाईना

उदंड वाढीलें वाढीलें। तऱ्ही तो धाईना
गर्वें बोलतो बोलतो। कोठेंचि माईना
राहे वस्तीस वस्तीस। चोरी तो वस्तांस
खोटा अभ्यास अभ्यास। हाणी महत्त्वास
लोक भलेसे दिसती। खेटरें चोरीती
वस्त्रें धोतरें पातरें। लपऊनि पळती
दास म्हणे रे भगवंता। किर्ता पाहसी सत्त्व
काय वांचोनी वांचोनी। ने परतें जीवित्व

या बारकाव्याच्या वर्णनाप्रमाणे अन्यत्रही त्या काळाचे प्रतिबिंब ठसठशीतपणे उमटलेले दिसेल :

लेंकुरें उदंड जालीं। तों लक्ष्मी निघोन गेली
बापुडीं भिकेसी लागलीं। खावया अन्न मिळेना (दा. ३·४·१)
...पदार्थ तितुका गेला। नुस्ता देशत्री उरला
येणें करितां बहुतांला। संकट आलें
...पुढे आला प्रजन्यकाळ। धान्य महर्ग दुष्काळ
शाकार नाहीं भळभळ। रिचवे पाणी
काहींच पाहतां धड नाहीं। विचार सुचेना काहीं
अखंड चिंतेच्या प्रवाहीं। पडले लोक
तथापि मार्ग चालेना। भिक्षा मागतां मिळेना
अवघे भिकारीच, जनां। काय म्हणावें? ( **परचक्रनिरूपण** )

दुष्काळी दुरवस्थेचा असा तपशील समर्थवाङ्मयात कितीतरी ठिकाणी आलेला दिसून येतो.

'अस्मानी' प्रमाणे सुल्तानीचा कहर असाच दारुण होता.
समर्थ म्हणतात—

बहूसाल कल्पांत लोकासि आला
महर्गें बहु धाडि केली जनांला
कितीयेक ते तांब्रबंदीच गेले
कितीयेक मान्हाष्ट्रबंदीं निमाले
कितीयेक ते छंद ना बंद कांहीं
कितीयेक बेबंद ते ठाईं ठाईं
कितीयेक ते प्राणकर्णेचि घेती

किती उत्तमा त्या स्त्रिया भ्रष्टवीती
किती मोट बांधूनि ते बूडवीती
पिछोडेंचि बांधोनि हिरोनि नेती ( अस्मानी सुल्तानी )

असा हा धाडीबांदोडीचा आणि छलवलाचा प्रकार सुरू होता. मठमंदिरांचा विध्वंस, स्त्रियांची विटंबना, बाटवाबाटवी ह्यांचे पुढील उल्लेख पाहा :—

कोणी येकें भ्रष्टविलें। कोणीं येकं धरून नेलें ( दा. ३.७.१६ )
...अकस्मात धाडी आली। कांता बंदी धरूनि नेली ( दा. ३·५·२८ )
...येक देव दुराचारीं। फोडिला बळें ( दा. ६·६·३४ )
...येक देव नेऊं घातला। पायातळीं ( दा. ६·६·३६ )

धर्मांतरे जुलुमाने होत, तशी लालचीने वा स्वखुषीनेही होत. समर्थ म्हणतातः

कित्येक दावलमलकासी जाती। कित्येक पीरासीच भजती
कित्येक तुरुक होती। आपले इच्छेनें ( दा. १·८·३२ )

हे जळते, धगधगते वास्तव पाहून खुद्द रामदासांचीच स्थिती

‘ उदंड दुःख लोकांचें। ऐकतां ऊर फाटतो ’

अशी होऊन गेली असली आणि ते समाजमनस्क बनले असले, तर त्यात नवल वाटण्याजोगे काही नाही. तीर्थाटनाच्या बारा वर्षांच्या काळात त्यांनी हे वास्तव प्रत्यक्ष पाहिले. आपला समाज दीनवाणा झाला आहे, तो कोलमडतो आहे, लाचारीचे, गुलामीचे जिणे त्याला जगावे लागत आहे, यामुळे त्यांचा जीव कासावीस झाला असला पाहिजे. समर्थांनी त्यांना आलेली ही प्रचीती प्रमाण मानली. आता समाजाला राजकारण, विवेक, प्रयत्नवाद शिकविला पाहिजे, तरच काही तरणोपाय आहे, अशी खूणगाठ त्यांनी बांधली असली पाहिजे. अध्यात्मविद्या वा परमार्थ ही राजविद्या आहे, तीच अत्युच्च असे ध्येय आहे, हे त्यांना माहीत होते; पण शास्त्राभ्यास, परमार्थ अशा दारुण दुःस्थितीत कसा काय साधणार ? ज्याचा प्रपंचच पुरता धोक्यात आहे, तो परमार्थासाठी काय रडणार ?

तेव्हा

‘ जन्म दुःखाचा अंकुर। जन्म दुःखाचा सागर ’ ( दा. ३·१·१ )

किंवा

संसार हाचि दुःखमूळ। लागती दुःखाचे इंगळ ( दा. ३·२·१ )

असा संसाराचा, प्रपंचाचा तिरस्कार करणारे समर्थच लोककल्याणार्थ पुढे बदलले; ते लोककल्याणासाठी गृहस्थाश्रमाचा आणि प्रपंचाचा पुरस्कार करू लागले :

आधीं प्रपंच करावा नेटका। मग घ्यावें परमार्थ विवेका
...प्रपंच सांडून परमार्थ कराल। तेणें तुम्ही दुःखी व्हाल
...प्रपंच सांडूनि परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला

मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ? ( दा. १२·१·१–४ )
बहुतां जन्माचा शेवट । नरदेह सांपडे अवचट
येथें वर्तावें चोखट । नीति न्यायें ( दा. ११·३·१ )
...ऐक सदैवपणाचें लक्षण । रिकामा जाऊं नेदी क्षण
प्रपंचव्यवसायाचें ज्ञान । बरें पाहे ( दा. ११·३·२४ )

गृहस्थाश्रमाचा महिमा समर्थांनी असा सांगितला आहे :

गृहस्थाश्रमी निर्माण जाले । आपला आश्रम टाकून गेले
परंतु गृहस्थागृहीं हिंडों लागले । कीर्तिरूपें ( दा. १४·७·३ )
या कारणें गृहस्थाश्रम । सकळांमध्यें उत्तमोत्तम
परंतु पाहिजे स्वधर्म । आणि भूतदया ( दा. १४·७·४ )
प्रपंची खाती जेवती । परमार्थी काय उपवास करिती ? ( दा. १२·७·५ )

## प्रयत्नवादाची हाकाटी

प्रपंच नेटका करावयाचा तर प्रयत्नाची कास धरली पाहिजे, ही गोष्ट समर्थांनी अन्वयव्यतिरेकी पद्धतीने परोपरीने टरविली आहे. अखंड सावधानता, येत्न, चाळणा, कष्ट, साक्षेप हे समर्थांचे परवलीचे शब्द आहेत. उलटपक्षी आळस, झोपाळूपणा, निजसुरेपणा; मैंदपणा यांचा त्यांनी हडसून खडसून निषेध केलेला आहे. समर्थ सांगतात.

अखंड सावधान रे । प्रयोग प्रेत्नमान रे
प्रसंग हा तुफान रे । नकोच वेवधान रे
मनीं धरूनि धारणा । करीं बरी विचारणा
प्रेत्न मूळ कारणा...( **धीरधरा, समर्थसंजीवनी**, पृ. ४० )
आधी कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ
साक्षपेंवीण केवळ । वृथा पुष्ट ( दा. ११·१०·२० )
यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नें वीण दरिद्रता
हिंडता शहाणें होतें । बोलतां बोल सीकतें
...घरीच बैसतां खोटें । ब्राह्मणू हिंडता बरा
आळशी घातवेणा तो । कष्टला म्हणजे बरा ( **बुद्धिपूर्वक यत्न**, १·३ )

परमार्थासाठीच कर्मयोगाचा, प्रयत्नवादाचा त्यांनी केलेला हा उद्घोष तर प्रसिद्धच आहे.

वन्हि तो चेतवावा रे । चेतवीतांचि चेततो
.. केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंच पाहिजे
यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ( **वन्हितो...** )

जो दुसऱ्यावरी विश्वासला। तयाचा कार्यभाग बुडाला
जो आपणचि कष्टत गेला। तोचि भला (दा. १९·९·१६)

### संघटनेचे तत्त्व

पुनरुक्तीचा दोष पत्करूनही समर्थांनी प्रयत्नवादाची शिकवण दिली, तद्वतच संघटनेचे महत्त्वही विवरून सांगितले. ‘समुदाव’ करावा, म्हणजे महत्कार्ये सिद्धीस जातात ही त्यांची धारणा आहे. त्यासाठी पाळावयाची पथ्येही त्यांनी सांगितली आहेत. त्यातली काही अशी :—

...बहुतांचे समाधान राखावें। बहुतां मानेल तें करावें
विरंग पडों नेदावें...(दा. १२·१०·२०)
या कारणें मनोगत। राखेल तोचि महंत
मनोगत राखतां समस्त। बोढोनि येती (दा. १३·१०·२९)
राखावीं बहुतांचीं अंतरें। भाग्य येतें तदनंतरें (दा. १९·३·१८)
जाणते नेणते राजी। राखावे बहुतां परी
सर्वास निववूं जाणे। धन्य तो जाणता गुणी
वर्तावयाचा विवेक। राजी राखणें सकळ लोक (दा. १३·१०·२३)

पण हा ‘समुदाव’सुद्धा एक विचाराने चालणाऱ्या शहाण्यांचा हवा, कारण समर्थांनी जनी जनार्दनु असला, तरी तो सज्जनींच असतो, असा इशारा दिला आहे. तेव्हा यत्न हवा, पण तो कीलोत्पाटी नको, अचूक यत्न हवा :

अचूक यत्न तो देवो। चुकणें दैत्य जाणिजे
न्याय तो देव जाणावा। अन्याय राक्षसी क्रिया (**वन्हितो...**)

यासाठी लोक शहाणे झाले पाहिजेत. त्यांना शहाणे करण्याची सूत्रेही त्यांनी अनेक वार विशद केली आहेत :

जितुकें कांहीं आपणासी ठावें। तितुकें हळुहळु सिकवावें
शाहणे करूनी सोडावे। बहुत जन (दा. १९.१०.१४)
आधीच सिकोन जो सिकवी। तोचि पावे श्रेष्ठ पदवी (दा. ११.६.१०)
मुलाचे चालीने चालावें। मुलाच्या मनोगतें बोलावें
तैसें जनासी सिकवावें। हळुहळु (दा. १३.१०.२४)
वेड्यास वेडें म्हणों नये। वर्म कदापि बोलों नये (दा. १३.१०.२६)
वेडे करावे शहाणे। तरीच जिणें श्लाघ्यवाणें (दा. १५–६.१५)

पण लोक तरी तुमचे केव्हा ऐकतात? तुम्ही ‘आधी केले मग सांगीतले’ असे निस्पृह असाल तरच. समर्थ निक्षून सांगतात :

अनुक्रमणिका

क्रियेवीण शब्दज्ञान। तेंचि श्वानाचें वमन
भले तेथे अवलोकन। कदापि न करिती ( दा. १२.१०.३० )
बोलण्यासारिखें चालणें। स्वयें करुनि बोलणें
तयाची वचनें प्रमाणें। मानती जनीं ( दा. १२.१०.३९ )

'क्रियेवीण वाचाळतां व्यर्थ आहे' हे 'मनाच्या श्लोकां'तील वचन सर्वतोमुखी आहेच.

## राजकारणोपयुक्त शिकवण

तत्कालीन लोकस्थितीचे निरीक्षण करून समर्थांनी प्रयत्नवाद, संघटन, लोकशिक्षण विवेकशीलता, सावधानता यांची ही जी शिकवण दिली, ती एक प्रकारे सार्वत्रिक उपदेशासारखीच ठरते. 'दुसरे तें राजकारण' म्हणून त्यांनी जे म्हटले आहे, त्याचा मग अर्थ काय? तत्कालीन राजकारणाला प्रत्यक्षाप्रत्यक्ष उपयुक्त ठरावे असे त्यांच्या 'दासबोधा'त काही आहे की नाही? वास्तविक पाहता मूर्खलक्षणांचा दुसरा, सगुण परीक्षेचा तिसरा, भीमदशकाचा आकरावा, आत्मदशक पंधरावा, बहुजिनसी अठरावा आणि शिकवणीचा एकोणिसावा हे सहा दशक सहज चाळले, तरी हा प्रश्न पडू नये. 'दासबोधा'त 'हरिकथा निरूपणा'स म्हणजे भक्ति-अध्यात्मास महत्त्वाचे स्थान असले तरी तेथे प्रपंचविज्ञान आणि राजकारण याचे वावडे आहे, असे मुळीच नाही. इतर संतांच्या तुलनेने समर्थांच्या शिकवणीत या गोष्टीवर अधिक भर आहे, एवढा तरी दावा 'दासबोधा'वरून अवश्य करता येण्याजोगा आहे.

## शिवसमर्थ भेट

पण 'हरिकथानिरूपणा'नंतर त्यांनी द्वितीय स्थान बहाल केलेल्या 'राजकारण' या शब्दाचा मुळात अर्थ काय, ही गोष्टच वादविषय होऊन बसलेली आहे. आणि हा वादविषय एका ऐतिहासिक वादाचा पोटविषय बनलेला आहे. हा ऐतिहासिक वाद म्हणजे शिवसमर्थभेटीविषयीचा वाद होय समर्थांची सांप्रदायिक चरित्रे वाकेनिशी टिपण आणि शिवाजीवरील बखरी यांच्या आधारे ही भेट स. १६४९ मध्ये म्हणजे शिवकार्याच्या प्रारंभकाळी झाली असे ठरते, तर गो. कां. चांदोरकरांनी २६ जून १९०६ च्या 'केसरी'तून पुढे आणलेल्या गोसाव्यांच्या पत्रद्वयावरून ही भेट स. १६७२ सालची म्हणजे शिवकार्याच्या उत्तरकाळातील ठरते. पहिल्या पक्षामध्ये समर्थ-भक्त देव, पांगारकर, शं. दा. पेंडसे, वि. का. राजवाडे, शं. गो. तुळपुळे वगैरे प्रामुख्याने संतवाङ्मयाचा व्यासंग केलेली मंडळी मोडते, तर दुसऱ्या पक्षात गो. चि. भावे, कृ. अ. केळुसकर, डॉ. बाळकृष्ण, सर जदुनाथ सरकार, अप्पासाहेब पवार आणि विशेषतः न. र. फाटक यांच्यासारखी प्रत्यंतरपुरावा म्हणजे अस्सल पत्रेच प्रमाण मानणारी

अनुक्रमणिका

प्रामुख्याने इतिहाससंशोधक मंडळी मोडते. पहिल्या पक्षानुसार रामदास हे शिवाजी महाराजांचे 'राजकीय गुरु' ठरतात, तर दुसऱ्या पक्षानुसार ते त्यांचे केवळ 'मोक्षगुरु' ठरतात. पण सारासार विचार करता या उभय भूमिका टोकाच्या आहेत, सत्य या दोहोंच्या अध्येमध्येच आहे, असे दर्शविणारा आणि रियासतकार सरदेसायांनी अधिकृत म्हणून मानलेला एक पुरावा उपलब्ध आहे. तो म्हणजे स. १६७८ साली महाराजांनी समर्थांना करून दिलेली सनद हा होय ही सनद कालदृष्ट्या या दोघा महापुरुषांच्या उत्तरायुष्यातील ठरत असली, तरी तीमध्ये शिवसमर्थसंबंधांची संक्षिप्त रूपरेखाच ग्रथित झालेली आहे.

या रूपरेखेचा तात्पर्यार्थ पाहिल्यास या उभयतांचा संबंध १६७२ पूर्वी आलेला असावा व तो अन्य 'मोक्षगुरु'पेक्षा अधिक घनिष्ठ असावा, अशा निष्कर्षाप्रत यावे लागते. मात्र या सनदेवरूनही समर्थांनी शिवाजी महाराजांना राजकारणाची प्रेरणा दिली किंवा स्वराज्यचळवळीच्या राजकारणात प्रत्यक्ष हातभार लावला, असे सिद्ध करता येणार नाही.

### 'राजकारण' म्हणजे काय ?

आता या ऐतिहासिक वादाचा पोटविषय जो 'राजकारण' या शब्दाचा अर्थ, त्याकडे वळू. 'दासबोधा'त हा शब्द एकूण २७ वेळा येतो. त्यांपैकी 'निस्पृह लक्षण' या समासातील

(१) महाराष्ट्र देश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला
अवकाश नाहीं जेवावला । उदंड कामें (दा. १५·२·४)

(२) तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अनुमानेना
कट्ट घालूनि राजकारणा । लोक लावी (दा. १५·२·२५)

या दोन स्थळी 'राजकीय उलाढाली' असा या शब्दाचा अर्थ प्रा. फाटकांनाही काही हातचा राखून, मान्य आहे. (**श्रीसमर्थ: चरित्र व संप्रदाय**, पुणे १९७२ पृ. ७·८) इतर सर्व स्थळी 'चातुर्य' किंवा 'कौशल्य' असा अर्थ ते सर्रास मानतात. पण पुढील काही उदाहरणांतही तो सरळ राजकीय क्षेत्राशीच निगडित आहे, असे म्हणता येईल.

(१) मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें
कित्येक खलक उगवावे । राजकारणामध्यें (दा. १९·९·१८)

(२) 'शिवरायाच्या गौरवपत्रा'त
'निश्चयाचा महामेरू । बहुत जनांसी आधारु
...या भूमंडळाचे ठायीं । धर्म रक्षी ऐसा नाहीं

अनुक्रमणिका

महाराष्ट्रधर्म राहिला कांहीं । तुम्हांकरितां ' असे म्हणून
' उदंड राजकारण तटलें । तेणें चित्त विभागलें '

या स्थळी ' राजकारण ' हाच अर्थ अभिप्रेत आहे, ' चातुर्य ' किंवा कौशल्य ' असा अर्थ येथे चपखल ठरणारच नाही.

खरे पाहता ' मुख्य तें हरिकथा निरूपण ' या प्रसिद्ध ओवीतही ' राजकारण ' शब्दाचा अर्थ फाटक म्हणतात, तसा ' चातुर्य ' वा ' कौशल्य ' असा मानल्यास पुढील चरणांत येणाऱ्या ' रूावधपण ' आणि ' साक्षेप ' या शब्दांचा बराचसा अर्थाशय आधीच काढून घेतल्यासारखे खचितच होते.

प्रा. फाटक यांनी घेतलेल्या ऐकांतिक भूमिकेमुळे या वादातील अंधश्रद्धेचा भाग निपटून निघाला, हे श्रेय त्यांना आवश्य देता येईल. तरीसुद्धा समर्थांच्याच शब्दांत सांगायचे तर ' जुनें ठेवणें मीपणें आकळेना ' असाच एकूण प्रकार या वादात उभय-पक्षी झाला असे म्हणणे भाग आहे.

वास्तविक रामदास हे अन्य संतांपेक्षा राजकारणाविषयी अधिक आस्था बाळगणारे होते, हे सिद्ध करण्यासाठी ऐतिहासिक कागदपत्रांची वा आडवळणी पुराव्यांची गरजच नाही. त्यांच्या ग्रंथरचनेतच ते राजकारणाविषयी चांगले जागरूक होते, हे दर्शविणारे प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुरावे हवे तेवढे आहेत. एकोणिसाव्या दशकातील नवव्या समासाचे नाव ' राजकारण ' हेच असून त्यातील धूर्तपणाचा उपदेश हा राजकारणातच विशेष उपयुक्त ठरावा असा आहे. त्यातील काही निवडक वेचे असे.

गनीमांच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरती भुजा
ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी
तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे
बंड पाखांडाचे वाखे । सहजचि होती
हीं धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये
हुंब्यास हुंबा लावून द्यावा । टोणण्यास टोणपा आणावा
लौंदापुढें उभा करावा । दुसरा लौंद
धटासि आणावा धट । उद्धटासी पाहिजे उद्धट
खटनटासी खटनट । अगत्य करी
जैसास तैसा जेव्हां भेटे । तेव्हां मजालसी थाटे
इतुकें होतें परी धणी कोठें । दृष्टीस न पडे (दा. १९·१०·२५–३१)

या उपदेशात शक्तीबरोबरच युक्तीचेही अंतःसूत्र मार्मिकपणे गोवलेले आहे.

' दासबोधा 'खेरीज उघड उघड राजकारणी मानल्या गेलेल्या स्फुट प्रकरणांतून

समर्थांचे राजकारणी व्यक्तित्व ठळकपणे प्रकट व्हावे हे साहजिकच. ' तुळजाभवानीच्या प्रार्थने 'त पुन्हा शक्तियुक्तीचा तौलनिक विचार आलेला आहे :

शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें कार्य होतसे
शक्तियुक्ति जये ठाईं । तेथें श्रीमंत धांवती
...फितव्यानें बुडती राज्यें । खबर्दारी असेचि ना
युक्ति ना शक्ति ना वेगी । लोक राजी असेचि ना

या प्रार्थनेत जे रोकडे मागणे मागितले आहे, तेही राजकारणी मागणे आहे :—

येकची मागणें आतां । द्यावें तें मजकारणें
तुझाचि वाढवीं राजा । शीघ्र आम्हांचि देखतां
दुष्ट संहारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवीं

' क्षात्रधर्म ' या प्रकरणामध्ये हतो वा प्राप्स्यसि स्वर्गसि स्वर्गम् । जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ' हा भगवद्गीतेचा संदेश मुखर झालेला आहे :—

मारितां मारितां मरावें । तेणें गतीस पावावें
फिरोन येतां भोगावें । महद्भाग्य
जैसा भांड्याचा गलोला । निर्भय भारामध्यें शिरला
तैसा क्षेत्री रिचवला । परसैन्यामध्यें
...मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा
येविषयीं न करितां तकवा । पूर्वज हांसती
मरणहांक तों चुकेना । देह वाचतां वांचेना
विवेकी होऊन समजाना । काय करावें ?
देवद्रोही तितुके कुत्ते । मारूनि घालावे परौते
देवदास पावती फत्ते । यदर्थीं संशय नाहीं
देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा
मुलुख बडवावा कां बुडवावा । धर्मस्थापनेसाठीं

हे ' धर्मसंस्थापने 'चे ध्येय आणि त्यासाठी क्षत्रियांना केलेले स्पष्ट आवाहन रामदासांच्या राजकारणी व्यक्तित्वाचेच निदर्शक ठरते.

## मुरलेले राजकारणी

शिवाजी महाराजांच्या निर्याणानंतर संभाजीराजांना समर्थांनी जे पद्यबद्ध पत्र पाठवले, त्यात ' उग्रस्थिती सोडावी, सौम्यता धरावी, मागील चुका ध्यानी न घेता जुन्या कारभाऱ्यांना जवळ करावें, लोकाचा प्रवाह तुंबू देऊ नये, सारे एक होऊन गनीमांना निरटून काढावें, प्रसंगाचे भान राखावे, रागाच्या आहारी जाऊ नये,

अनुक्रमणिका

आहे ते जतान करावे व आणखीही मिळवून जिकडे तिकडे महाराष्ट्र राज्य करावे व त्यासाठी

शिवरायास आठवावें । जीवित्व तृणवत् मानावें
इहपरलोकीं रहावें । कीर्तिरूपें

यानंतर ' शिवरायाचें आठवावें रूप...प्रताप...साक्षेप ' इ. सर्वप्रसिद्ध उपदेश आलेला आहे. राजकारणाचे सूक्ष्म ज्ञान, तत्कालीन परिस्थितीची उत्कृष्ट जाण आणि संभाजीराजांच्या स्वभावाची अचूक परीक्षा असल्याशिवाय असा उपदेश करताच आला नसता. या पद्यात्मक पत्रामागे एक मुरलेले राजकारणी व्यक्तित्व आहे, हे विवरून सांगण्याची गरज नाही.

तीच तऱ्हा ' आनंदवनभुवना 'ची आहे. हे पद्यप्रकरण काशीक्षेत्राला उद्देशून रचलेले असो, महाराष्ट्राला उद्देशून रचलेले असो किंवा प्रा. श्री. म. माटे म्हणतात तसा त्याचा पूर्वार्ध काशीशी आणि उत्तरार्ध शिवदिग्विजयोत्तर महाराष्ट्राशी मिळता–जुळता असो. राजकारणी समर्थांनी आत्मनिष्ठ वृत्तीतून पाहिलेले ते एक भव्य आणि दिव्य स्वप्न आहे. आपल्या धार्मिक मानबिंदूची विटंबना झाल्याने दुखावलेल्या मनाला पुढे तिचा प्रतिशोध घेतल्यावर, राजकीय सूड घेतल्यावर जे समाधान लाभते, अपेक्षापूर्तीचा जो उत्कट आनंद होतो, तो या स्वप्नाच्या शब्दाशब्दांतून जणू उचंबळून ओसंडतो आहे.

## कालोचित संदेश

' मानपंचका 'तील रामराज्याचे आदर्श चित्रही असेच ध्वध्वीतपणे रेखाटले गेले आहे. कोदंडधारी राम हे समर्थांचे आराध्यदैवतच होते. रामकथा ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावी, ही त्यांची मनीषा होती. त्यांनी रामायणावर आधारित जी आख्यान-रचना केली आहे; तीमध्येसुद्धा तत्कालीन राजकीय आकांक्षाचे पडसाद उमटलेले आहेत. देवांना बांदीवडीतून मुक्त करणारा बंधविमोचन राम ही प्रतिमा प्रथम संत एकनाथांनी आपल्या ' भावार्थ रामायणा 'त पाहिली, आपल्या ' श्री एकनाथ वाङ्मय आणि कार्य ' [ १९५० ] या ग्रंथात प्रा. फाटक यांनी अगदी राक्षसांच्या दाढयांपर्यंत काळाचे पडसाद ' भावार्थ रामायणा 'मध्ये कसे दिसून येतात, ते सूक्ष्मपणे दाखवून दिले आहे [ पृ. १९३ ] तरीपण एकनाथांची भूमिका ' आत्मा–राम अहं–रावण दोघांचे युद्ध दारुण ' अशी आध्यात्मिक ध्वनीवर केंद्रित झालेली होती. रामदासांच्या प्रयत्नवादी मनाला रामकथा याच तऱ्हेने थोडी वेगळ्या पद्धतीने भावली आहे. त्यांनी आपल्या रामायणात रामाच्या आणि विशेषतः हनुमताच्या पराक्रमाचे प्रत्ययकारी दर्शन घडवून वीररसाचा परिपोष साधण्यावर भर दिला आहे. या आख्यान रचनेतूनसुद्धा समर्थांना क्षात्रधर्मी पराक्रमाचा कालोचित संदेश देऊन पर्यायाने राज

कारणाचाच पाठपुरावा करावयाचा होतो, असा त्या रचनेचा अन्वयार्थ लावल्यास तो अनाठायी ठरणार नाही.

एकंदरीत अस्मानी सुल्तानीची चित्रणे, क्षात्रधर्म, राजधर्म यांचा विचार, रामवरदायिनीकडे केलेले रोकडे मागणे, संभाजीराजाला केलेला उपदेश, आनंदवनभुवनाचे हर्षोत्फुल्ल स्वागत, रामकथेतून सुचविलेला ध्वन्यर्थ, यांचे हेतुबीज ध्यानात घेतल्यास स्वकालीन राजकीय चळवळीला पोषक ठरेल, अशी शिकवण समर्थांनी दिलेली आहे, हे सत्य पत्करल्यावाचून गत्यंतरच नाही.

### या विवेचनाच्या मर्यादा

येथपर्यंत समर्थ रामदासांच्या शिकवणीचे जे विविध पैलू पुढे मांडले, ते आध्यात्मिक विचाराला वगळून मांडले हे मला मान्य आहे. अध्यात्म वा परमार्थ हे समर्थांच्या शिकवणीतील मुख्य प्रतिपाद्य होते. हे पुनश्च स्पष्ट करणे अवश्य आहे. दासबोधाचा गाभा ब्रह्म-माया, आत्मा-परमात्मा, विद्या-अविद्या, सगुण-निर्गुण, सद्गुरुमहिमा, नवविधा भक्ती यानेच भरलेला आहे. ‘ हरिकथा निरूपण ’ हेच समर्थांचे साध्य होते. पण हे नीट साधण्यासाठी ‘ राजकारण ’, ‘ सावधपण ’, ‘ साक्षेप ’ ही साधने समर्थांनी विवरून सांगितली. मी येथील विवेचनात साध्यापेक्षा साधनांवर भर दिला आहे. याची मुख्यतः दोन कारणे आहेत. एक म्हणजे म्हणजे साधनविवेचनाची प्रस्तुतता आजही संपलेली नाही. आणि दुसरे आणि खरे कारण म्हणजे परमार्थमार्गाच्या व्यासंगाची माझी मर्यादा. या माझ्या मर्यादेसाठी रसिकांनी मला उदार मनाने क्षमा करावी.

●

[ कै. पु. मं. लाड व्याख्यानमालेत दि. २२–३–८२ रोजी दिलेल्या पहिल्या व्याख्यानाचा सारांश ]

## साभार स्वीकार



### कादंबरी

- **कुंडलपुरातील कुंडले :** मुकुंद निंबर्ते; वर्तमान कौशल्य प्रकाशन; पुणे; १९८०; रु. ११.
- **अवघड नाका :** मधुकर केणी; श्रीविद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८२; रु. १७–५०.
- **अव्यक्त :** शंकर इनामदार; श्रीविद्या प्रकाशन; पुणे ३०; १९८२; रु. १७–५०
- **जिद्द :** सुरेश वाळिंबे; अजब पुस्तकालय; कोल्हापूर; १९८२; रु. १२.
- **तृषार्त :** सौ. रजनी शेठ; अजब पुस्तकालय; कोल्हापूर; रु. २५.
- **लोफड :** महादेव मोरे, अजब पुस्तकालय कोल्हापूर; रु. २५.
- **निखळलेली तारका :** अरविंद पाटोळे; पावा साहित्य मंडळ प्रकाशन; पुणे; १९८२; रु. १२.
- **कृषिराज :** हनुमंत गवळी; माया प्रकाशन, वहिरोबा नाला पुणे १३; १९८२ रु. २५.
- **चिंचवन :** रा. वा. मुंजवाडकर; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८२ रु. २०.
- **दलितस्थान झालेच पाहिजे :** दादूमिया; श्रीविशाखा प्रकाशन, पुणे ३०; १९८२; रु. ३०.

### कविता

- **ब्रह्माचा खांब :** श्रीरंग वि. जोशी; अजब पुस्तकालय, कोल्हापूर; १९८२.
- **शंखध्वनी :** नारायण लाळे; स्नेहल टिळक, गिरगाव, मुंबई ४; १९८२; रु. ६.
- **आतून बंद बेट :** श्रीधर शनवारे; कविता शनवारे, गोकुळ पेठ, नागपूर; १९७८ रु. १०.
- **सल :** मधुकर गो. देशपांडे; मृत्युंजय प्रकाशन, ९७८ शिवाजीनगर, पुणे १६; १९८२ रु. ७.

- **झुंबर :** लक्ष्मीनारायण बोल्ली; सौ. वैजयंती चव्हाण, सोमवार पेठ, सोलापूर; १९८२; रु. ८
- **प्रवास :** वैजनाथ महाजन; अभिनव प्रकाशन, मुंबई १४; १९७२; रु. १०
- **महाराष्ट्र मानस माधुरी भा–१ :** विजयकुमार चोकसे-अनु; हिंदी निकेतन टिळक रोड, पुणे ३०.
- **बच्चन गीतांजली :** विजयकुमार चोकसे; अनु; हिंदी निकेतन, पुणे ३०; १९८२ रु. १५.
- **गर्भरेशीम :** इंदिरा; नवसाहित्य प्रकाशन, बेळगाव; १९८२ रु. २८
- **नश्वर घरटा :** कै. अ. र. चिंचाळकर; विजय चिंचाळकर, पुणे ३०; १९८२
- **मनाचे डोह :** गोविंद कुलकर्णी; स्वयंप्रभा प्रकाशन, नांदेड; १९८२ रु. १६
- **कांगारू :** अविनाश कोलारकर; राम कोलारकर, पुणे १८; १९८२ रु. ४ (बालगीते)

## कथा

- **परवाची गोष्ट :** दिनकर लोखंडे; अनिरुद्ध साहित्य, पुणे ३०; १९८१; रु. १२.
- **झडीचे दिवस :** अनंतराव पाटील; मेहता पब्लि. हाऊस, पुणे ३०; १९८१, रु. १५.
- **शिरसलामत :** बाळ गाडगीळ; मेहता पब्लि. हाऊस, पुणे ३०; १९८२; रु. २३
- **पं. सूरिजन विरचित परमहंस कथा :** सुभाषचंद्र अक्कोळे : संपादित; जैन संस्कृती संरक्षक संघ, सोलापूर; १९८२; रु. ५
- **म्हातारीनं झाकला कोंबडा :** अनुराधा गुरव; अजब पुस्तकालय, कोल्हापूर १९८२; रु. २०
- **माणूस आणि कळस :** अरविंद गोखले; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८२ रु. २५.
- **गर्भ :** नारायण लाळे; छत्रपती प्रकाशन, मुंबई ४; १९८२; रु. ६.

## चरित्रे व गौरवग्रंथ, व्यक्तिचित्रे

- **देवगिरीकर चरित्र :** रा. प्र. कानिटकर; त्र्यं. शि. भारदे; गांधीभवन, कोथरूड, पुणे २९; १९८१; रु. १०.
- **त्रिदल :** (बॅ. पी. जी. पाटील व सौ. सुमतीबाई पाटील गौरवग्रंथ); एम्. ए. शेख–संपा; एम्. व्ही. फडके आणि कं. कोल्हापूर; १९८१; रु. ४५.
- **प्रतिमा :** रा. ग. जाधव; परिमल प्रकाशन, औरंगाबाद; १९८२, रु. २०.

अनुक्रमणिका

## समीक्षा, लेख, प्रवास-आठवणी-अनुभव, राजकारण व इतर

- ललितकला व ललितवाङ्मय : दु. का. संत; एम्. व्ही. फडके आणि कं; कोल्हापूर; १९८२, रु. २५.
- अवतीभवती : विजया राजाध्यक्ष; मेहता पब्लि-हाऊस, पुणे ३०; १९८२; रु. १५.
- इस्त्राएलचे भारतीय चित्र : हमीद दलवाई; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८२, रु. १०
- जगप्रवास शोध आणि बोध : वा. वा. गोखले; प्रपंच प्रकाशन, पुणे ३०; १९८२, रु. २०.
- ब्लॅक इज ब्युटिफुल : सुधा गोखले; सौ. माधुरी परांजपे; विलेपार्ले, मुंबई ५७; १९८२, रु. १५.
- हिंदुराष्ट्रवाद : एक विचार : शं. रा. दाते; काळ प्रकाशन, पुणे ३०; १९८२, रु. ५.
- A descriptive Calafogue of Manuscripts in the Moropant Collection in the library of the University of Bombay–Vol I–compiled by Usha R. Bhise; A. C. Tikekar, University of Bom. Bombay, 400032; 1981; Rs. 45.

■

## परिषद-कार्यवृत्त



एप्रिल १९८२ पासून परिषदेचे नवे कार्यकारी मंडळ अस्तित्वात आले.

दि. ४ एप्रिल व १६ मे रोजी मंडळाच्या दोन सभा झाल्या. पहिल्या सभेत पदाधिकाऱ्यांची व विविध कार्यासाठी काही समित्यांची निवड हे मुख्य कार्य झाले. १६ मे रोजीच्या सभेत १९८१-८२ चे कार्यवृत्त आणि ८१-८२ ची हिशेब पत्रके यांचा विचार होऊन १९८२-८३ चा अर्थसंकल्प संमत करण्यात आला. घटना-दुरुस्ती समितीने शिफारस केलेल्या काही दुरुस्त्यांचाही कार्यकारी मंडळाने विचार केल आणि काही बदल करून तो विशेष साधारण सभेकडून संमत करून घ्यावा असे ठरले.

**कवी अनिल यांना श्रद्धांजली :** ८ मे रोजी कवी अनिल यांचे नागपूर येथे निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी १४ मे रोजी, श्री. ग. ल. ठोकळ यांच्या अध्यक्षतेखाली प्रकट सभा भरली होती. श्री. नारायण सुर्वे, सौ. संजीवनी मराठे, डॉ. वि. म. कुलकर्णी आणि रविकिरण मंडळाचे वयोवृद्ध सदस्य प्रा. श्री. बा. रानडे यांनी या सभेत अनिलांविषयी व्यक्तिगत आठवणी सांगून त्यांच्या कवितेची यथार्थ महती सांगितली. अध्यक्ष ठोकळ यांचे भाषण झाल्यावर परिषदेने ठराव मांडून श्रद्धांजली वाहिली. ठराव येणेप्रमाणे—

'मराठीतील एक श्रेष्ठ कवी आत्माराम रावजी देशपांडे उर्फ कवी अनिल यांचे ८ मे रोजी, नागपूर येथे ब्यायशीव्या वर्षी निधन झाले. उत्कट विचारगर्भ भावकवी आणि मुक्तछंदाचे सक्रिय पुरस्कर्ते या नात्याने काव्यक्षेत्रात अनिल यांची कामगिरी मोलाची आहे. अ. भा. मराठी संमेलने आणि मराठी साहित्य महामंडळ या दोन कार्याशी त्यांचा अतिशय जिव्हाळ्याचा अतूट संबंध होता. अनिल यांच्या निधनामुळे शिक्षण, साहित्य आणि सांस्कृतिक क्षेत्रातील एक कर्तृत्ववान, रसिक नेतृत्व हरपले आहे. परिषदेची ही प्रकटसभा अनिल यांना आदरपूर्वक श्रद्धांजली वाहत आहे.'

**ज्ञानकोशकार स्मृतिदिन :** १० एप्रिल हा ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर यांचा स्मृतिदिन. या दिवशी सकाळी कमला नेहरू उद्यानातील केतकर यांच्या स्मारकास पुष्पांजली वाहण्यात आली. सायंकाळी परिषदेच्या सभागृहात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री आणि सौ. गायत्रीदेवी पटवर्धन यांची केतकरांचे व्यक्तित्व आणि

अनुक्रमणिका

महनीय कार्य यासंबंधी माहितीपूर्ण व उद्‌बोधक व्याख्याने झाली. तर्कतीर्थांनी नव्या कार्यकारी मंडळास शुभेच्छा व्यक्त करून आशीर्वाद दिला. कार्यक्रमापूर्वी कार्याध्यक्ष ग. वा. बेहेरे यांनी स्वागतपर भाषण केले व शेवटी आभार कार्यवाह म. श्री. दीक्षित यांनी मानले.

**पंतप्रतिनिधी स्मृतिदिन :** साहित्य संमेलनाचे पूर्वाध्यक्ष आणि परिषदेच्या वास्तु-साठी भूमीदान करणारे औंधाचे रसिक राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांच्या स्मृतिदिनी ( १३ एप्रिल ) त्यांच्या कुटुंबियांसमवेत परिषदेच्या कार्यकर्त्यांनी साहित्यिक गप्पागोष्टींचा कार्यक्रम केला. बॅ. आप्पासाहेब पंतप्रभृती या प्रसंगी उपस्थित होते.

**डॉ. अवचट यांचा सत्कार :** डॉ. अनिल अवचट यांना ' माणसं ' या पुस्तकाला कराड संमेलनाचे ५००० रु. चे ग्रंथपारितोषिक मिळाल्याबद्दल परिषदेने दि. १९ एप्रिलला श्री. ना. ग. गोरे यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचा प्रकट सत्कार केला. आरंभी कार्यवाह राजेंद्र बनहट्टी यांनी उपस्थितांचे स्वागत केले. त्यानंतर डॉ. अवचट यांचे ' आजचे मराठी साहित्य आणि सामाजिक प्रश्न ' या विषयावर त्यांच्या नेहमीच्या शैलीत विचारप्रवर्तक भाषण झाले. यानंतर काही प्रश्नोत्तरे झाली व श्री. नानासाहेब गोरे यांच्या स्पष्टोक्तीपूर्ण भाषणानंतर समारंभ संपला.

**मुलाखती :** २३ एप्रिलला प्रा. रा. भि. जोशी आणि प्रा. शांता शेळके यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम झाला. प्रा. सौ. अंजली सोमण, अरुणा ढेरे, श्रीपाद जोशी आणि राजा मंगळवेढेकर यांनी उभयतांना प्रश्न विचारून मुलाखत फुलवत ठेवली. कार्याध्यक्ष बेहेरे यांनी कार्यक्रमाचे संचालन केले.

**रविंद्रनाथांना आदरांजली :** दि. २२ व २३ मे रोजी परिषदेने पुण्यातील बांगला भारती संस्थेच्या सहकार्याने रविंद्रनाथ टागोर यांचा १२१ वा जन्मदिवस साजरा केला. या निमित्ताने प्रो. गिरींद्रनाथ चट्टोपाध्याय ( बरद्वान विद्यापीठ ) यांची ' सद्यःस्थितीत रवींद्रविचारांची महती ' या विषयावर इंग्रजीत दोन विद्वत्तापूर्ण व्याख्याने झाली. रविंद्रकृत गीतगायनाने कार्यक्रमाची सांगता झाली.

**परिषदेचा वर्धापनदिन :** २७ मे हा परिषदेचा वर्धापनदिन. तो दरवर्षी एकादा वाङ्मयीन कार्यक्रम करून साजरा करावयाचा असे नव्या कार्यकारिणीने ठरविले. त्याप्रमाणे २७ मे रोजी, परिषदेचा ७६ वा वर्धापनदिन साजरा झाला. म. सा. महामंडळाचे अध्यक्ष प्राचार्य कवी गजमल माळी प्रमुख पाहुणे होते. याप्रसंगाने नवोदित कवींचे कविसंमेलन आयोजित करण्यात आले होते. कार्यवाह श्री. बनहट्टी यांनी पाहुण्यांचे आणि सर्व कवींचे स्वागत केल्यानंतर अरुणा ढेरे, अनिल कांबळे, राजा दीक्षित, रमण रणदिवे, नंदकुमार पुरोहित, सौ. विमल लिमये, अरविंद पाटोळे, राम रांजणे, सौ. संगीता जोशी, सतीष इनामदार, खांबेकर, सौ. अनुराधा पाटील ( ज्यांच्या ' दिगंत ' संग्रहाला परिषदेचे गतवर्षी पारितोषिक लाभले ) प्रभृती तेरा

नवोदितांनी आपापल्या निवडक तीन कविता सादर केल्या. प्रा. गजमल माळी यांनी आरंभी व शेवटी औचित्यपूर्ण भाषण करून सर्व नवोदितांचे कौतुक केले. कविसंमेलनचा हा कार्यक्रम रसिकांनी वारंवार दाद दिल्यामुळे चांगला रंगला.

**वीर वामनराव जोशी जन्मशताब्दी :** देशभक्त नाटककार कै. वीर वामनराव जोशी यांच्या जन्मशताब्दीनिमित्त ३ जूनला शाहीर गोविंदस्वामी आफळे यांचे सुश्राव्य व स्फूर्तिदायक कीर्तन झाले. हा नाविन्यपूर्ण कार्यक्रम श्रोत्यांना फार आवडला.

**कार्यविस्तार :** परिषदेचे नवे पदाधिकारी नव्या उत्साहाने कार्याला लागले आहेत. दोन महिन्यात त्यांनी पुण्यातील व पुण्याबाहेर प्रचार करून ५२ नवे आजीव आणि ५२ नवे वार्षिक सभासद केले. कार्यक्रमात वैपुल्य नि विविधता आणण्यासाठी, तसेच काही वाङ्मयीन प्रकल्प पूर्ण करण्यासाठी द्रव्यबलाचे पाठबळ लागते. या दृष्टीने यत्न चालू आहेत. दि. २४ व २५ रोजी कोल्हापूर व इचलकरंजी येथे ग. वा. बेहेरे, राजा फडणीस. म. श्री. दीक्षित, वसंत स. जोशी आणि केशवराव कोठावळे यांनी प्रचार-कार्य करून, कोल्हापूर शाखाकार्यास नवी चालना दिली व इचलकरंजी येथे नवी शाखा स्थापण्याचा यत्न केला. कोल्हापूर येथे भरलेल्या द. महाराष्ट्र सा. संमेलनासही सर्वजण उपस्थित राहिले. अध्यक्ष ग. ल. ठोकळ यांना पुष्पहार घालून त्यांचा सत्कार करण्यात आला.

■



## महाराष्ट्र-साहित्य-परिषद

वार्षिक सभेची सूचना
१९८१-८२ चे कार्यवृत्त
१९८१-८२ चे उत्पन्नखर्च पत्रक
१९८१-८२ चा ताळेबंद
१९८२-८३ चा अर्थसंकल्प
विश्वस्तांकडील निधी

**उत्पन्न खर्च-पत्रक**
**ताळेबंद व १९८२-८३ अर्थसंकल्प**

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

### वार्षिक साधारण सभेची

**सूचना**

दि. ७ जून १९८२

स. न. वि. वि.

परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २७ जून १९८२ सायंकाळी ठीक ५ वाजता, पुणे येथे परिषदेच्या 'माधवराव पटवर्धन सभागृहा'त भरणार आहे. या सभेला सर्व सभासदांनी अवश्य उपस्थित व्हावे ही विनंती.

**कामे**

( १ ) श्रद्धांजली
( २ ) मागील सभेचा वृत्तान्त
( ३ ) १९८१–८२चे कार्यवृत्त संमत करणे
( ४ ) १९८१–८२ चे उत्पन्न – खर्चपत्रक आणि ताळेबंदपत्रक संमत करणे.
( ५ ) १९८२–८३ चा अर्थसंकल्प संमत करणे.
( ६ ) हिशेब तपासनिसांची नेमणूक ( ८२–८३ करिता )
( ७ ) अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

आपले

| | | |
|---|---|---|
| **राजा फडणीस** | **ग. वा. बेहेरे** | **श्री. ज. जोशी** |
| कोशाध्यक्ष | कार्याध्यक्ष | अध्यक्ष |
| **म. श्री. दीक्षित** | **राजेंद्र बनहट्टी** | **वसंत स. जोशी** |
| कार्यवाह | कार्यवाह | कार्यवाह |

**विशेष सूचना :** वार्षिकवृत्त आणि हिशेबपत्रके यासंबंधी कोणास काही विशेष माहिती हवी असेल तर त्यांनी तसे पत्र सभेपूर्वी चार दिवस कार्यालयाकडे पाठवावे.

अनुक्रमणिका






# वार्षिक कार्यवृत्त ( १९८१-८२ )

परिषदेच्या कार्याचे तपशीलवार वृत्त १९८१–८२ मधील ' पत्रिके 'च्या अंकातून सभासदांपुढे टेविले असल्यामुळे आता प्रस्तुत कार्यवृत्त महत्त्वाच्या नोंदीसह संक्षिप्तपणे सादर करीत आहोत :

**सभासद संख्या :** मार्च ८१ अखेर सभासद संख्या आजीव १०८० आणि वार्षिक साधारण १२३० अशी एकूण २३१० होती. वर्षभरात १०० आजीव आणि ४२४ साधारण अशी ५२४ ची भर पडून, मार्चअखेर आजीव ११८० आणि साधारण १६५४=२८३४ सभासद आहेत. या वाढीमध्ये महाराष्ट्राच्या बहुतेक सर्व विभागांतील आणि सामाजिक स्तरांतील सभासद आहेत ही गोष्ट आवर्जून नमूद करावीशी वाटते.

**अमृतमहोत्सव :** वृत्तान्तवर्षात दोन दिवस साजरा झालेला अमृतमहोत्सव ही विशेष उल्लेखनीय घटना. दि. २७ व २८ मे रोजी सकाळपासून रात्रीपर्यंत या उत्सवात विविध कार्यक्रम झाले. परिषदेची स्थापना झाली त्या वास्तूचे ( मळेकर वाडा) जागी भरलेला मेळावा, समारंभाचा टिळक स्मारक मंदिरातील मुख्य कार्यक्रम, जुन्यानव्या कार्यकर्त्यांची अनौपचारिक बैठक, नामवंतांचे कविसंमेलन, ' आजचे वाङ्मय समाधान देते काय ? ' या विषयावरील परिसंवाद, वाङ्मयेतिहासाला उपयुक्त ठरणारी चर्चासत्रे, ' अमृतशारदा ' या वाङ्मयीन व्यक्तिचित्रात्मक आकर्षक स्मरणिकेचे प्रकाशन–ही उत्सवाची वैशिष्ट्ये सांगता येतील. ( तपशील अंक २१७ पाहा ) अमृतमहोत्सवानिमित्त महाराष्ट्राच्या विविध क्षेत्रातील काही ज्येष्ठ आदरणीय व्यक्तींना परिषदेने प्रथमच सन्मान्य सभासद करून घेतले.

**ग्रंथव्यवहार परिषद :** गेल्या तीन वर्षांत ग्रंथव्यवहार परिषद हा परिषदेने सुरू केलेला नवा उपक्रम. ३१ आक्टोबर व १ नोव्हेंबरला तिसरी परिषद वणी ( यवतमाळ ) येथे कै. प्राचार्य नरहर कुरुंदकर यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. ग्रंथव्यवहाराशी संबंधित विषयावरील तीन परिसंवाद, व. पु. काळे यांचे कथाकथन आणि सुरेश भट यांचे काव्यवाचन असे कार्यक्रम या परिषदेत झाले परिषदेला आलेल्या प्रतिनिधींची श्री बाबा आमटे ( आनंदवन, वरोरा ) यांच्याशी झालेली काव्यशास्त्रविनोदात्मक मुक्तचर्चा हा आणखी एक लाभ. प्राचार्य राम शेवाळकर आणि त्यांचे सहकारी यांनी परिषदेच्या यशासाठी फार परिश्रम घेतले. ( तपशील पत्रिका अंक २१९ पाहा ).

**ग्रंथप्रकाशन :** संशोधन विभागातर्फे सिद्ध झालेल्या ' भाषा व साहित्य संशोधन ' ( संपादक वसंत स. जोशी ) या ग्रंथाचे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते

अनुक्रमणिका

झालेले प्रकाशन ही एक महत्त्वाची घटना. प्रस्तुत ग्रंथात तीस तज्ज्ञ लेखकांच्या संशोधनपर लेखांचा समावेश असून महाविद्यालयातील विद्यार्थी, प्रबंधार्थी अध्यापक आणि इतर संशोधक या सर्वांना ग्रंथ उपयुक्त ठरणार आहे. सा. सं. मंडळाने आणि पुणे विद्यापीठाने अनुदान दिल्यामुळे ६०० डेमी पृष्ठांचा हा ग्रंथ ग्राहकास ३० रुपयांत ( वजा १५ टक्के कमिशन ) उपलब्ध करून दिला जात आहे.

**वाङ्मयेतिहास खंड** : वाङ्मयेतिहास योजनेतील खंड १, २, ६ आणि ७ या चार खंडांचे काम पूर्ण करण्याचा कार्यकारी मंडळाचा संकल्प होता. पैकी खंड २ (१३५० ते १६८०) चे लेखनकार्य संपादक डॉ. स. गं. मालशे यांनी पूर्णतेला नेऊन मुद्रणप्रत परिषदेच्या स्वाधीन केली. पुरेशा द्रव्याभावी त्याचे प्रकाशन मार्चपर्यंत करता आले नाही. खंड १ चे संपादन डॉ. हेमन्त विष्णू इनामदार यांचेकडे सोपविले आहे व ते आगामी वर्षअखेर पूर्ण होईल अशी अपेक्षा आहे. खंड ६ व ७ (१९२१ ते १९८०) चे संपादक प्रा. गो. म. कुलकर्णी आणि डॉ. व. दि. कुलकर्णी करीत आहेत. विषयांची आखणी, लेखकांची निवड, संपादक-लेखकांच्या बैठकी, अधिकारी व्यक्तींची मार्गदर्शनपर चर्चासत्रे-अशा योजनापूर्वक रीतीने खंडांचे काम चालू आहे. सहावा खंड ( १९२१ ते ४७ ) येत्या आक्टोबर पर्यंत मुद्रणासाठी सिद्ध होत आहे.

**संदर्भ-ग्रंथालय** : परिषदेच्या कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयात वर्षभरात ५०० नवीन ग्रंथांची भर पडली असून वर्षअखेर ग्रंथसंख्या २०७३४ झाली आहे. महाविद्यालयीन विद्यार्थीवर्ग वाढत्या संख्येने ग्रंथालयाचा लाभ घेत असतो. याशिवाय घरी नेऊन ग्रंथाभ्यास करणाऱ्या सभासद-वाचकांची संख्या सुमारे ४०० आहे.

**देणग्या** : अमृतमहोत्सवाचे निमित्ताने परिषदेला मिळालेली आजवरची सर्वात मोठी देणगी ( रु. १२,००० ) श्री. गणेश गोपाळ टाकूरदेसाई यांचेकडून मिळाली. ती मिळविण्याचे कामी विश्वस्त वि. त्र्यं. शेटे यांचे मोलाचे सहाय्य झाले. प्रस्तुत देणगीवरील व्याजातून वर्षाआड पाच व्याख्याने आणि दोन ग्रंथ पारितोषिके देण्यात यावयाची आहेत. कै. वि. द. घाटे यांच्या कुटुंबियांकडून मिळालेल्या रु. ३५०० च्या देणगीतून प्रतिवर्षी कै. घाटे यांच्या जन्मदिनी एखादा साहित्यविषयक उपक्रम करण्यात येणार आहे. श्री. शंकर प्रधान यांनी अकाली निधन पावलेल्या त्यांच्या पुत्राचे स्मरणार्थ ३००० ची देणगी उत्कृष्ट बालवाङ्मयाला पारितोषिक देण्यासाठी दिली. परिषद वरील व यापूर्वी उल्लेख झालेल्या सर्व देणगीदारांची ऋणी आहे. बेळगावचे रसिक उद्योगपती श्री. बा. म. गोगटे ५००१ रु. देऊन उपकर्ते सभासद झाले ही गोष्टही कृतज्ञतापूर्वक नमूद केली पाहिजे.

अनुक्रमणिका

**स्मृतिदिन व शताब्दी कार्यक्रम :** परिषदेतर्फे दरवर्षी काही स्मृतिदिन पाळले जातात. स्मृतिदिनांचे निमित्ताने व्याख्यानादी जे कार्यक्रम होतात त्यासाठी काही व्यक्तींनी परिषदेला देणग्या दिलेल्या आहेत व त्या देणग्यांवरील व्याजाची रक्कम या कार्यक्रमांसाठी खर्च होत असते. यंदा झालेले कार्यक्रम येणेप्रमाणे : १० एप्रिल, ज्ञानकोशकार केतकर, वक्ते डॉ. य. दि. फडके. १३ एप्रिल, बाळासाहेब पंतप्रतिनिधी, वक्ते श्री. म. वि. सोवनी, २१ जून, नाथमाधव, वक्ते प्रा. शरद वाघ, २९ नोव्हेंबर, माधव जूलियन, वक्ते प्रा, कु. ब. निकुंब २३ जानेवारी, वि. द. घाटे, वक्ते प्रा श्री. पु. भागवत (हा कार्यक्रम २३ जानेवारीऐवजी सोयी-साठी २३ रोजी झाला.) १८ व १९ फेब्रुवारी, श्री. म. माटे, वक्ते प्रा. विद्याधर पुंडलिक (सोयीसाठी २५ डिसेंबरऐवजी या तारखांना) २५ फेब्रुवारी, वि. कों. ओक, बालसाहित्य व प्रचारमाध्यमे या विषयावर परिसंवाद, ६ मार्च, ना. गो. चापेकर, वक्ते डॉ. हेमंत इनामदार. ८ मार्च, पिलाजीराव फडणीस, नारायण सुर्वे यांच्यासह नवोदित कवींचे पुण्याच्या पूर्व भागात कवि-संमेलन.

'समाजस्वास्थ्य' कार र. धों. कर्वे आणि वामन मल्हार जोशी यांच्या जन्म-शताब्दीनिमित्त आणि निबंधमालाकार चिपळूणकर यांच्या निर्वाणशताब्दी-निमित्त अनुक्रमे डॉ. य. दि. फडके, प्रा. गो. म. कुलकर्णी आणि डॉ. द. न. गोखले यांची विचारप्रवर्तक भाषणे झाली. लोकनायक अणे शताब्दी समितीच्या सहकार्याने २९ ऑगस्टला परिषदेने 'अक्षरमाधव खंड २' (सं-राम शेवाळकर) या ग्रंथांचा प्रकाशन समारंभ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हस्ते घडवून आणला. कै. गोविंदराव टेंबे व्याख्यानमाला गेली दहा वर्षे काही कारणाने खंडित झाली होती. टेंबे यांच्या जन्मशताब्दीनिमित्त यंदा ती पुन्हा सुरू करण्यात आली. १३ व १४ मार्च रोजी डॉ. सुनील सुभेदार (नागपूर) यांची 'अभिनयाचे संदर्भ' या विषयावर व्याख्याने झाली. रंगभूमीवरील नटवर्गाचा अभिनय आणि वैद्यकी निदाने, उपचार (विशेषतः होमिओपथी) या दोन्हींचा कसा संबंध आहे हा त्यांच्या व्याख्यानांतील मुख्य विचार नवा होता.

**काही महत्त्वाचे उपक्रम :** शारदीय व्याख्यानमाला आणि दिवाळीअंक स्पर्धा हे परिषदेने सुरू केलेले अलिकडल्या काळातले दोन उपक्रम. यंदाच्या शारदीय मालेत काही नामवत पत्रकारांनी आपापली व्यावसायिक सुखदुःखे कथन केली. स्पर्धेसाठी जे दिवाळी अंक आले त्यातून निवड समितीने दीपावली, पुस्तकपंढरी आणि युगवाणी या तीन अंकांना तीन दिवंगत अशा श्रेष्ठ संपादकांच्या नावे पारितोषिके देण्यात आली 'साहित्यसूची' आणि 'जाईजुई' या अंकांना विशेष पारितोषिके लाभली. २२ मार्च रोजी वैजापूरच्या विनायकराव पाटील महाविद्यालयाच्या सहकार्याने भरलेले 'ग्रामीण आत्मकथन शिबिर' हा यंदाचा आणखी एक महत्त्वाचा उपक्रम.

अनुक्रमणिका

**दोन इतर कार्यक्रम :** २९ ऑगस्टला श्री. रंगनाथ कुलकर्णी यांनी ' सुदाम्याचे पोहे ' हा एकपात्री कार्यक्रम सादर केला. किर्लोस्कर मासिकांचे संपादक श्री. मुकुंदराव किर्लोस्कर यंदा निवृत्त झाले. यानिमित्ताने त्यांच्या प्रकट मुलाखतीचा कार्यक्रम झाला व त्यांच्या आजवरच्या सेवेचा पुष्पगुच्छ देऊन गौरव करण्यात आला.

**काही प्रिय, काही अप्रिय :** साहित्य क्षेत्रातील गुणीजनांचा सत्कार आणि या क्षेत्रातील हरपलेल्यांना श्रद्धांजली हे कार्यक्रम कर्तव्य म्हणून परिषद नेहमीच करीत आली. रायपूर संमेलनाचे अध्यक्षपद प्रा. गंगाधर गाडगीळ यांना लाभल्यामुळे १० डिसेंबरला त्यांचा प्रकट सत्कार करण्यात आला. वेंगुर्ले येथे भरलेल्या बाल-कुमार संमेलनाचे अध्यक्ष श्री. यदुनाथ थत्ते होते. संमेलनापूर्वी प्रा. कवी वसंत सावंत यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचाही सत्कार करण्यात आला.

कन्नड आणि मराठीचे दोन श्रेष्ठ सारस्वतकार यंदा अस्तंगत झाले. कविश्रेष्ठ द. रा. बेंद्रे वृद्धापकाळामुळे, तर विचारवंत वक्ते आणि समीक्षक प्राचार्य नरहर कुरुंदकर अकाली, तेही अकल्पितपणे. प्रकट सभा आयोजित करून या दोघाही श्रेष्ठांना परिषदेने आदरपूर्वक श्रद्धांजली वाहिली.

**शाखासभांचे कार्य :** परिषदेच्या कार्यक्षेत्रात नाशिक आणि रत्नागिरी जिल्ह्यां-खेरीज बहुतेक भागात शाखासभा आहेत चालू वर्षी पिंपरी–चिंचवड आणि खोपोली ( जि. रायगड ) या दोन शाखांची स्थापना होऊन आता ही शाखांची संख्या बारा झाली आहे. अमृत-महोत्सवाचे निमित्ताने परिषदेने शाखांना आर्थिक मदत देऊन ग्रामीण भागात काही कार्यक्रम घडवून आणले. या शाखांकडून आपापल्या कार्याचे जे वृत्त आले ते येणेप्रमाणे :

**( १ ) सांगली :** दि. २८ फेब्रुवारीला अष्टा येथे द युनिक फ्रेंडस् असोसि-एशनच्या सहकार्याने चार नवोदित कथाकारांचे कथा–कथन. १ मार्चला प्रा. म. द हातकणंगलेकर यांच्या अध्यक्षतेखाली श्री. नारायण सुर्वे यांचे मंत्रमुग्ध करणारे काव्यगायन. ६ मार्चला प्रा. कृ. ब. निकुंब यांच्या षष्ठ्यब्दीपूर्तीनिमित्त सत्कार आणि त्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्ह्यातील दहा कवींचे काव्यगायन. कार्यक्रमात शाखेचे कार्यवाह श्रीनिवास शिंदगी यांचा सहभाग आणि शाखाध्यक्ष श्री. य. द. लिमये यांनी संपूर्ण कार्यक्रमाचे केलेले शीघ्र काव्यात्मक आलोचन हे समारंभाचे वैशिष्ट्य होते. कै. कुरुंदकर, दै. अग्रदूतचे संपादक कै. अण्णासाहेब कुंभोजकर, कै. गो. गं. पारखी यांना शाखेतर्फे श्रद्धाजली वाहण्यात आली.

**( २ ) वाई :** डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती, सा. सं. मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांचा सत्कार व ' संस्कृतीतील साहित्याचे स्थान ' या विषयावर व्याख्यान, सप्टेंबरमध्ये वाई परिसरातील साहित्यिक व कलावंत यांचा मेळावा, यशस्वी कलावंतांना ऑक्टोबरमध्ये प्रा. वसंत कानेटकर यांच्या हस्ते पारितोषिके,

अनुक्रमणिका

त्याचवेळी श्री. ग. वा. बेहेरे यांनी 'मला नाटक कसे सुचते' या विषयावर घेतलेली कानेटकरांची प्रकट मुलाखत, कविवर्य द. रा. बेंद्रे यांना श्रद्धांजली व प्रा. अ. रा. तोरो यांचे बेंद्रे यांच्या जीवन-साहित्यासंबंधी भाषण, श्री. बजरंग शेलार यांच्या 'भरती' कादंबरीचे श्री. पु. पां. गोखले यांच्या हस्ते प्रकाशन – असे विविध कार्यक्रम शाखेतर्फे झाले. शाखेच्या कार्यकारी मंडळात १४ सदस्य असून डॉ. शरद अभ्यंकर (अध्यक्ष), डॉ. वसंत स. जोशी (कार्याध्यक्ष), डॉ. शिवाजीराव चव्हाण व श्री. पां. व. कोल्हापुरे (कार्यवाह), श्री. शंकरराव चव्हाण (कोषाध्यक्ष) हे प्रमुख पदाधिकारी आहेत.

(३) **सातारा** : २० डिसेंबरला डॉ. एस. जी. सबनीस यांचे 'विश्व स्वधर्मे सूर्ये पाहो' या विषयावर व्याख्यान, १० जानेवारीला डॉ. आनंद यादव यांचे मार्गदर्शनाखाली गोंदवले येथे नवोदित कथाकारांचा मेळावा आणि २८ जानेवारीला प्रा. ह. श्री. शेणोलीकर यांच्या अध्यक्षतेखाली 'उपरा' चे लेखक श्री. लक्ष्मण माने यांच्या सत्कारानिमित्त त्यांच्या कृतीवर प्रकट चर्चा. श्री. मनोहरपंत भागवत (अध्यक्ष), डॉ. द. ता. भोसले (उपाध्यक्ष), श्री. वि. वि. बाग (कार्यवाह) हे शाखेचे प्रमुख पदाधिकारी.

(४) **नेवासा** : ३० जानेवारीला श्री. चांदेकर (उपशिक्षण संचालक) यांचे 'ज्ञानेश्वरीतील विज्ञानवादी दृष्टिकोण' या विषयावर व्याख्यान, २२ फेब्रुवारीस आदर्श शिक्षक प्राचार्य मोहनराव हापसे यांचा सत्कार, बाभुळखेडे येथे प्रा. अ. भि. शिंदे आणि प्रा. बाबुळदे यांची ज्ञानेश्वरीवर प्रवचने. प्राचार्य डॉ. श्री. वि. कडबेकर (अध्यक्ष), प्रा. दि. वि. करवंदे (कोषाध्यक्ष), प्रा. अ. वि. एरंडे (कार्याध्यक्ष), प्रा. अ. भि. शिंदे हे शाखेचे प्रमुख पदाधिकारी.

(५) **खोपोली** : दि. २९ जानेवारीला श्री. ना. ग. गोरे यांच्या हस्ते शाखेचा उद्घाटन सोहळा, २३ फेब्रुवारीला डॉ. वि. रा. करंदीकर यांचे 'समर्थ रामदास' या विषयावर व्याख्यान, नगरपालिकेकडून शाखेला १००० रुपयांचे अनुदान. आचार्य डॉ. माधव पोतदार (अध्यक्ष), श्री. रवींद्र घोडके (कार्याध्यक्ष), श्री. व्ही. व्ही. जोग (कोषाध्यक्ष) आणि सौ. पी. पी. देशपांडे, अनंत ओक, एम. व्ही. कुलकर्णी हे तिचे कार्यवाह आहेत.

(७) **ठाणे** : १३ जुलैस शाखेचा द्वि. वर्धापनदिन व त्याप्रसंगी प्रमुख पाहुणे श्री. ग. वा. बेहेरे याचे 'साहित्याचे वैरी' या विषयावर व्याख्यान, तसेच श्री. चिं. शं. जोशी यांचा सत्कार. १३ ऑगस्टला कै. पु. भा. भावे यांच्या स्मृत्यर्थ 'भावे: व्यक्ति आणि वाङ्मय' या विषयावर शं. ना. नवरे, प्रभाकर अत्रे, शंकरराव जोशी, मंदाकिनी भारद्वाज, श्री. म. सहस्रबुद्धे यांची भाषणे. ऑक्टोबरच्या आरंभी जव्हार येथे प्रा. अनंतराव पाटील यांच्या सहकार्याने झालेल्या

शारदोत्सवात प्रा. म. वि. फाटक, नयना आचार्य, आशा साठे, प्रकाश गीध, अशोक चिटणीस, र. म. शेजवलकर यांचा चर्चात्मक सहभाग. १९ नोव्हेंबरला लायन्स इंटरनॅशनलच्या सहकार्याने जिल्ह्यातील अपंग साहित्यिकांचा सत्कार व प्रा. म. वि. फाटक यांचे स्वातंत्र्यशाहीर गोविंद यांच्संबंधी व्याख्यान. लीला जोशी यांनी अपंग साहित्यिकाच्या मुलाखती घेतल्या. वणी येथील ग्रंथव्यवहार परिषद व रायपूरच्या सा. संमेलनातील कार्यक्रमात शाखेच्या प्रमुख कार्यकर्त्यांचा सहभाग. २६ जानेवारी १९८१ मधील मराठी कादंबरीवर परिसंवाद, रायपूर संमेलनाचे वृतान्तकथन, विनायक मोहरील यांचे कवितागान. २० फेब्रुवारीला कोसबाड हिल येथे अनुताई वाघ यांच्या उपस्थितीत काव्यगायन आणि मुलांसाठी कथाकथन. त्यात आशा साठे, वत्सला पंडित, विभावरी अंतरकर यांचा भाग. २५ फेब्रुवारीला प्राचार्य ना. वि. पाटणकर यांच्या अध्यक्षतेखाली 'विद्यापीठीय शिक्षण व मराठी' या विषयावर झालेल्या परिसंवादात न. र. पारसनीस, शं. कृ. आपटे, रमेश पानसे, मीरा जठार, कुमुदिनी भागवत, सुरेखा पाठक, अरुंधती पानसे, अरुण फडके यांची भाषणे. मराठी ग्रंथसंग्रहालय, नगरवाचन मंदिर आणि लायन्स इंटरनॅशनल या तीन संस्थांचे शाखेला यंदा विशेष सहकार्य लाभले. प्रा. म. वि. फाटक, चिं. शं. जोशी, प्रभाकर अत्रे, नयना आचार्य इत्यादी पदाधिकाऱ्यांच्या यत्नांमुळे वर्षभर शाखा कार्यान्वित राहिली.

(७) **सोलापूर** : कवी हिमांशु कुलकर्णी, श्री. दया पवार, कवी संजीव, लोककवी मनमोहन, कवी ना. रा. पवार, श्री. काकासाहेब जक्कल, रामकृष्णपंत वेत, कवी जोशी – इत्यादींचा प्रसंगोचित सत्कार, नवसाहित्य परिषदेच्या विभागीय संमेलनास आणि स्व. संगीतशिक्षक नाना पाटील यांच्या कुटुंबियास शाखेतर्फे प्रत्येकी ५१ रु. चे साहाय्य, प्रा. वसंत पाफळकर, बार्शी (कवितेत काय असते) प्रा. र वा. मंत्रकर (साहित्यातील रसास्वादाच्या दिशा) माढा येथे प्रा. विलास पाटील (स्वप्ने : कालची व आजची) पंढरपूर व खुद्द सोलापूर येथे श्री. ग. वा. वेहेरे यांचे व्याख्यान व मुलाखत. श्री. प. पु. देव यांचा संगीत रंगभूमी शत-सांवत्सरिकानिमित्त साग्रसंगीत कार्यक्रम, नीलिमा अंबिके यांचे सुश्राव्य गायन, सिद्राम जाधव आणि मंडळींचे सुंद्रीवादन, करकंब येथे दत्ता हलसगीकर प्रभृतींचे काव्यगायन, कुंजविहारी काव्यस्पर्धा व पं. सुमतीबेन शहा यांचे हस्ते पारितोषिक वितरण इत्यादी सांस्कृतिक, रंजक कार्यक्रम. कै. वा. म. जोशी जन्मशताब्दीनिमित्त प्रा. सौ. अंजली सोमण यांचे 'वा. म. जोशी यांनी रंगविलेल्या स्त्रिया' या विषयावर खास व्याख्यान. सोलापूर व परिसर या भागातील उत्कृष्ट पुस्तकांच्या प्रकाशनाची व्यवस्था. अध्यक्ष प्रा. यशस्विनी खडिलकर, कार्याध्यक्ष श्री. रा. त्र्यं. छत्रपती, दत्ता हलसगीकर इत्यादी कार्यकर्ते आणि इतर सहकारी यांच्यातील एकोप्यामुळे शाखेचे कार्य अनेक दृष्टीने विस्तारत आहे.

अनुक्रमणिका

जळगाव, धुळे, अहमदनगर, पिंपरी-चिंचवड या शाखांकडून वार्षिक वृत्त वेळेवर हाती आले नाही. पण या शाखांचे बहुतांश वृत्त पत्रिकेच्या २१९ व्या (आक्टोबर - डिसेंबर ८१) अंकात छापले आहे. प्रा. ल. नी. छापेकर, प्रा. प्र. श्रा. चौधरी, श्री. स. सो. सुतार, नवे कार्याध्यक्ष प्रा. शा. न. पाटील, उपाध्यक्ष कृष्णा पाटील, कार्यवाह वसंत चव्हाण प्रभृती कार्यकर्ते जळगाव शाखेचे कार्य विस्तारित आहेत. प्रा. कुसुमाकर शिंपी, प्रा. दा. वि. पाटील इ. पदाधिकारी धुळे शाखेचे कार्य पाहत असतात. प्रा. वसंत के. दीक्षित आणि वयोवृद्ध ज्येष्ठ कार्यकर्ते श्री. दत्तोपंत डावरे हे मुख्यतः अहमदनगर शाखेचे आधार आहेत. पिंपरी-चिंचवड शाखेने शाहिरांचा मेळावा, कविसंमेलने, साहित्यिक गप्पा असे अनेक कार्यक्रम करून आणि नगरपालिकेकडून कार्यालयासाठी जागा व अनुदान मिळवून अनुकरणीय कार्य साधले. डॉ. श्री श्री. घारे, अध्यक्ष गिरीश प्रभुणे, कार्याध्यक्ष अशोककुमार त्रिभुवन इत्यादींच्या यत्नांमुळे शाखा आपल्या परिसरात लोकप्रिय होत आहे.

**ग्रंथपारितोषिके :** काही वाङ्मयप्रेमी गृहस्थांनी आपल्या आप्तस्वकीयांच्या स्मरणार्थ परिषदेकडे ठेवरूपाने ज्या रकमा सुपूर्त केल्या आहेत त्या रकमांवरील व्याजाचा विनियोग आठ ग्रंथ पारितोषिके देण्यासाठी करण्यात येतो. मार्च ८२ मध्ये सात लेखकांना व एका प्रकाशकास अशी पारितोषिके देण्यात आली (तपशील पत्रिका अंक २२० जानेवारी – मार्च ८२)

**महामंडळ सभा :** वृत्तवर्षात पुणे, मुंबई, रायपूर (दोन) व औरंगाबाद अशा पाच सभा झाल्या. परिषदेच्या प्रतिनिधींनी (कार्याध्यक्ष वि. रा. करंदीकर, ह. श्री. शेणोलीकर आणि म. वि. फाटक) उपस्थित राहून, वादग्रस्त प्रश्नांसंबंधीच्या ठराव मांडून ते प्रतिष्ठापूर्वक सोडविण्याचा यत्न केला. श्री. ग. वा. बेहेरे रायपूर संमेलन प्रसंगीच्या महत्त्वाच्या सभेस प्रा. शेणोलीकर यांनी राजीनामा दिल्यामुळे उपस्थित होते. अमृतमहोत्सवानिमित्त पुणे येथे झालेल्या सभेत परिषदेस १००० रु. ची देणगी देऊन महामंडळाने चांगली प्रथा पाडली.

**ऋणनिर्देश :** परिषदेच्या कार्यात अनेक संस्था व व्यक्ती यांचे सहकार्य लाभत असते. सर्वांचे नामोल्लेख करणे शक्य नसले तरी महाराष्ट्र शासनाचे शिक्षण खाते, साहित्य–संस्कृती मंडळ, पुणे महानगरपालिका, ग्रंथालय–संचालनालय. नियतकालिके आणि वृत्तपत्रे; साहित्याच्या प्रेमाखातर होणारे महाराष्ट्राच्या सर्व विभागातील आजीव सभासद इत्यादींचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणे आवश्यक वाटते.

**म. श्री. दीक्षित**
दि. १६ मे १९८२ **राजेंद्र बनहट्टी**
**वसंत स. जोशी**
कार्यवाह

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य

### शेड्यूल VII

### दिनांक १ एप्रिल १९८१ ते दिनांक ३१ मार्च

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **मालमत्तेसंबंधी** | | |
| भुईभाडे व म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर | ९६०–०० | |
| इमारत दुरुस्ती | ३२२–१० | |
| विमा | ६५–०० | |
| फर्निचर व वस्तुदुरुस्ती | ८७–०० | |
| जनरल मेन्टेनन्स ... | १,७४३–१५ | |
| प्रकाशन ग्रंथसाठ्याच्या किंमतीतील घट ... | २,५५७–०९ | ५,७३४–३४ |
| **व्यवस्थापन** | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | १५,२८४–२२ | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी. | २,०६१–६२ | |
| टपाल व दूरध्वनी | ३,६०७–९० | |
| कार्यकारी मंडळ ( प्रवासादी खर्च ) | ५,१७७–१० | |
| प्रवास व प्रचार कार्य | २,८२७–९० | |
| वीज | ४,००४–५४ | |
| हिशोब तपासनीस फी | ३५०–०० | |
| निवडणूक खर्च | ६,६५९–०५ | ३९,९७२–३३ |
| आतिथ्य | ९५४–२० | |
| विश्वस्त खाते | ३८–०० | |
| इतर | ५३७–९५ | १,५३०–१५ |
| **घसारा** | | |
| इमारत २॥ टक्के. | १,६८५–७४ | |
| फर्निचर १० टक्के. | ९२०–४८ | |
| ग्रंथालय १० टक्के | ३,५७०–५९ | ६,१७६–८१ |
| **संस्थेच्या उद्देशांकरिता** | | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ४,८९७–९० | |
| महामंडळ ( सभाखर्च व वर्गणी ) | १,४४१–५५ | |
| शाखा सभा ( वर्गणी हिस्सा ) ... | ३,८२८–०० | |
| पत्रिका ( कागद, छपाई, टपाल इ. ) ... | ३५,९००–८० | |
| ग्रंथालय ( वेतन व इतर खर्च ) | ५,०२३–३५ | |
| प्रकाशन खर्च | ४९–६० | ५१,१४१–२० |
| बेरीज पुढील पानावर ओढली | | १,०४५५४–८३ |

परिषद, पुणे ४११०३०
नियम ( १ ) प्रमाणे
१९८२ या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| उत्पन्न | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **व्याज** | | |
| सेव्हिंग्ज खात्यावरील | १,९०८-५० | |
| ठेवींवरील | १९,६८९-५२ | २१,५९८-०२ |
| **डिव्हिडंड** | | १४३-०० |
| **देणग्या** | | २२,४६६-०० |
| **अनुदाने** | | |
| साहित्य-संस्कृती मंडळ ( म. सा. पत्रिकेसाठी ) | १०,०००-०० | |
| ग्रंथालय | १,४६३-०० | |
| महानगरपालिका | ५००-०० | |
| वार्षिक शासकीय अनुदान | १५,०००-०० | |
| वाङ्मयेतिहास ( खंड ६ ) अनुदान | ५,०००-०० | ३१,९६३-०० |
| **इतर उत्पन्ने** | | |
| साधारण सभासद वर्गणी | १३,०४७-०० | |
| संलग्न संस्था वर्गणी | १७०-०० | |
| पत्रिका ( वर्गणी व जाहीरात ) | ३,०५७-४० | १६,२७४-४० |
| **तूट** ( १९८१-८२ ताळेबंदाकडे वर्ग) | | १५,३२९-११ |

बेरीज मागील पानावरून १,०७,७७३-५३

# महाराष्ट्र साहित्य

## शेड्यूल II

### दिनांक १ एप्रिल १९८१ ते दिनांक ३१ मार्च

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **ग्रंथ पारितोषिके व स्मृतिदिन** | | १,०४,५५४–८३ |
| कै. ह. स. गोखले | १००–०० | |
| कै. अ. स. गोखले | १००–०० | |
| कै. विश्वनाथ पार्वती गोखले | १५०–०० | |
| कै. गिरिजा गंगाधर जांभेकर | १५०–०० | |
| कै. ह. ना. आपटे | १००–०० | |
| कै. शि. म. परांजपे | ३००–०० | |
| कै. विनायक कोंडदेव ओक स्मृतिदिन | ९०–३० | |
| नाथमाधव स्मृतिदिन | १०८–०० | |
| कै. ना. गो. चापेकर स्मृति. | ४१०–०० | |
| कै. पिलाजीराव फडणीस स्मृति. | २०१–६० | |
| कै. ज्ञानकोशकार केतकर स्मृति. | १५०–०० | |
| श्री. म. माटे. स्मृतिदिन | ४५१–०० | |
| तुळशीराम वाघ पारितोषिक ... | ४५०–०० | |
| गोविंदराव टेंबे स्मृतिदिन | ४५७–८० | ३,२१८–७० |
| एकूण...रु. | | १,०७,७७३–५३ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार

पाटणकर अँड असोसिएटस्

चार्टर्ड अकौंटंटस्‌करिता

एन. सी. भळगट

भागीदार

पुणे,

दि. ३१ मे, १९८२



अनुक्रमणिका

परिषद, पुणे ४११०३०
नियम ( १ ) प्रमाणे
या वर्षाचे उत्पन्न-खर्च पत्रक

| उत्पन्न | रु. | पै. | रु. | पै. |
|---|---|---|---|---|
| मागील पानाची बेरीज | | | १,०७,७७३ | ५३ |
| एकुण...रु. | | | १,०७,७७३ | ५३ |

म. श्री. दीक्षित
कार्यवाह

राजा फडणीस
कोशाध्यक्ष

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य

### शेड्यूल III

**दिनांक ३१ मार्च १९८२**

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|---|
| **विश्वस्त निधी** | | | |
| मागील ताळेबंदावरून | १४८, ३२६-४५ | | |
| १९८१ मधील आजीव सभासद वर्गणी जमा | | २४,२७१-०० | १,७२,५९७-४५ |
| **इतर राखीव निधी** | | | |
| ( १ ) इमारत | | ८९,६४४-९४ | |
| ( २ ) ग्रंथालय | | २३,५७३-१० | |
| **( ३ ) हीरक महोत्सवी प्रकाशने** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३३,४७३-४९ | | |
| १९८१-८२ मधील विक्री | १,४९९-१७ | | |
| + ३१-३-८२ चा साठा | ८००-०० | | |
| | ३५,७७२-६६ | | |
| **वजा** : १-४-८१चासाठा | ३,९५७-४० | ३१,८१५-२६ | |
| **( ४ ) वाङ्मयेतिहास योजना** | | | |
| मागील ताळेबंदावरून | १,८०,६५६-६९ | | |
| + १९८१-८२मधील विक्री | २,०२२-४५ | | |
| + ३१-३-८२ चा साठा | १२,०००-०० | | |
| | १,९४,६७९-१४ | | |
| **वजा** : दि.१-४.८१चा साठा | ५१,४३०-०० | १४३,२४९-१४ | |
| ( ५ ) प्रकाशन निधी | | ३३,०९१-२० | |
| **( ६ ) पारितोषिके व स्मृति-दिन निधी** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३५,४१६-०० | | |
| + ८१-८२ मधील नफा | १८,५००-०० | ५३,९१६-०० | ३,७५,२८९-६४ |
| **संशोधन प्रकाशने** | | | |
| मागील शिल्लक | ११,८८०-५० | | |
| + ८१-८२ मधील विक्री | ३,४४८-२० | | |
| + ३१-३-८२चा साठा | १२,०००-०० | २७,३२८-७० | |
| **वजा** : १९८१-८२मधील खर्च | | २४,७३०-४० | २,५९८-३० |
| बेरीज पुढील पानावर | | | ५,५०,४८५-३९ |

अनुक्रमणिका







परिषद्, पुणे ४११ ०३०
नियम (१) प्रमाणे
रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रु. पैसे | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|---|
| **स्थिर जिंदगी :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | ६७,४२९-७४ | |
| **वजा** घसारा २½ टक्के | | १,६८५-७४ | ६५,७४४-०० |
| **गुंतवणूक :** | | | |
| **( १ ) रोखे दर्शनी किंमतीचे** | | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन१९४६चे | ५,३००-०० | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन | २,७००-०० | ८,०००-०० | |
| **( २ ) शेअर्स :** | | | |
| सेंट्रल प्रॉव्हिजन्सेस रेल्वेज | २,३००-०० | | |
| महा. स्टेट को-ऑप. बँक | १,२५०-०० | ३,५५०-०० | ११,५५०-०० |
| **फर्निचर व डेडस्टॉक :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ८,६२९-८१ | | |
| अधिक १९८१-८२ची खरेदी | ५७५-०० | ९,२०४-८१ | |
| **वजा** - घसारा | | ९२०-४८ | ८,२८४-३३ |
| **ग्रंथालय :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | ३२,५५०-१५ | | |
| अधिक १९८१-८२ची खरेदी | ३,१५५-७५ | ३५,७०५-९० | |
| **वजा** : घसारा | | ३,५७०-५९ | ३२,१३५-३१ |
| **शिल्लक साठा :** | | | |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | | १२,०००-०० | |
| हीरक महोत्सव प्रकाशने | | ८००-०० | |
| संशोधन प्रकाशन | | १२,०००-०० | |
| उर्वरित प्रकाशने | | ३,५००-०० | २८,३००-०० |
| **वाङ्मयेतिहास योजना :** | | | |
| मागील वर्षापर्यंतचा खर्च | | ७२,२६९-६० | |
| + १९८१-८२चा खर्च | | १६,३४६-३५ | ८८,६१५-९५ |
| बेरीज पुढील पानावर | | | २,३४,६२९-५ |

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य

**शेड्यूल VIII**

**दिनांक ३१ मार्च १९८२**

| निधी व देणी | रु. पैसे | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|---|
| बेरीज मागील पानावरून | | | ५,५०,४८५-३९ |
| **ग्रंथव्यवहार परिषद** | | | |
| मागील शिल्लक | | १,०३१-१२ | |
| **वजा :** १९८१-८२ | | | |
| सालातील खर्च | | १,०३१-१२ | ००-०० |
| **अमृतमहोत्सव खाते :** | | ४७,५१९-१० | |
| +१९८१-८२मधील जमा : | | | |
| (१) स्मरणिका खाते | ५५,२८२-६५ | | |
| (२) कार्यक्रम खाते | ८,७७१-७० | | |
| | ६४,०५४-३५ | | |
| **वजा :** १९८१-८२मधील खर्च | | | |
| (१) स्मरणिका खाते | २८,२४२-७० | | |
| (२) कार्यक्रम खाते | ३१,०५०-५५ | | |
| | ५९,२९३-२५ | ४,७६१-१० | ५२,२८०-२० |
| **प्रॉव्हिडंट फंड :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | १२,५४०-१४ | |
| + १९८१-८२ची जमा | | १,७६२-६१ | १४३०२-७५ |
| **ग्रंथालय अनामत :** | | १२,२७६-०० | |
| + १९८१-८२ची जमा | | ८३०-०० | १३,१०६-०० |
| हिशेब तपासनीस देणे | | | ३५०-०० |
| एकूण बेरीज | | | ६,३०,५२४-३४ |

आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार पाटणकर अँड असोसिएटस, चार्टर्ड अकौंटंटस् करिता.

पुणे, दि. ३१ मे १९८२,

**एन. सी. भळगट**
भागीदार

अनुक्रमणिका






**नियम (१) प्रमाणे**

**रोजीचा ताळेबंद (पुढे चालू)**

| जिंदगी व येणी | रु. पैसे | रु. पैसे | रु. पैसे |
|---|---|---|---|
| बेरीज मागील पानावरून | | | २,३४,६२९-५९ |
| वीज बोर्ड अनामत | | | २६०-०० |
| आयकर वसुली | | | २४६-०० |
| इतर येणी | | | ५,०००-०० |
| **ठेवी :** | | | |
| **(अ) पारितोषिके व व्याख्याने** | | | |
| वि. द. घाटे स्मरणार्थ | ३,५००-०० | | |
| सुनील प्रधान स्मरणार्थ | ३,०००-०० | | |
| श्री. गणेश-सरस्वती देसाई यांचे नावे | १२,०००-०० | | |
| केतकर स्मृतिदिन | १,५००-०० | | |
| शि. म. परांजपे पारितोषिके | ३,५००-०० | | |
| गोखले बंधु पारितोषिक | २,०००-०० | | |
| बँक ऑफ महाराष्ट्र (ठेवी) | ३९,९००-०० | | |
| बडोदा बँक-विश्वस्त (ठेवी) | ७२,०००-०० | | |
| स्टेट बँक, पुणे कँप-विश्वस्त (ठेवी) | ७०,०००-०० | २,०७,४००-०० | |
| **(ब) ग्रंथालय अनामत** . . . | | १,०००-०० | |
| **(क) प्रॉव्हिडंट फंड (ठेवी)** | ३,२९४-०१ | | |
| प्रॉव्हिडंट फंड (सेव्हिंग्ज) | ११,००८-७४ | १४,३०२-७५ | २,२२,७०२-७५ |
| **तूट :** | | | |
| मागील ताळेबंदावरून | | १,२४,९१७-८७ | |
| + चालू वर्षाची | | १५,३२९-११ | १,४०,२४६-९८ |
| **अखेरच्या शिलका :** | | | |
| बँक ऑफ महाराष्ट्र (से.) | | ६,५८५-५६ | |
| स्टेट बँक-विश्वस्त खाते (से.) | | २,२६२-१२ | |
| बँक ऑफ बडोदा विश्वस्त खाते (से.) | | १६,३४६-९८ | |
| बँक ऑफ बडोदा (करंट) | | २,३०३-४७ | |
| रोख | | ४०-८९ | २७,५३९-०२ |
| एकूण बेरीज | | | ६,३०,५२४-३४ |

**लक्ष्मणशास्त्री जोशी**

**म. श्री. दीक्षित** — कार्यवाह

**राजा फडणीस** — कोशाध्यक्ष

**वि. त्र्यं. शेटे**

**वि. ग. माटे**

विश्वस्त

अनुक्रमणिका








## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

### विश्वस्तांकडील निधी : ताळेबंदानुसार

(३१ मार्च १९८२)

| | रु. पै. | | १९८०–८१ रु. पै. | १९८१–८२ |
|---|---|---|---|---|
| **(१) रोखे दर्शनी किंमतीचे** | | | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन १९४६ चे | २,७००–०० | २,७००–०० | २,७००–०० | २,७००–०० |
| **(२) शेअर्स** | | | | |
| सें. प्रॉव्हिन्सेस रेल्वेज (१००)×(२३) | २,३००–०० | | | |
| महा. स्टेट को. ऑ–बँक लि., (५०)×(२५) | १,२५०–०० | ३,५५०–०० | ३,५५०–०० | ३,५५०–०० |
| **(३) स्थिर निधी** | | | | |
| स्टेट बँक (ठेवी) १५८००+५४२०० | ७०,०००–०० | | ७०,००–०० | |
| बँक ऑफ बडोदा (ठेवी) | ५७,०००–०० | | ७२,०००–०० | |
| स्टेट बँक (सेव्हिंग्ज) | १,९२५–२८ | | २,१६२-१२ | |
| बँक ऑफ बडोदा (सेव्हिंग्ज) | १३,८७१–४४ | १,४२,७९६–७२ | १६,३४६-९८ | १,६०५०९–१० |

अनुक्रमणिका

| | रु. पैसे | | १९८०-८१ रु. पैसे | १९८१-८२ रु. पैसे |
|---|---|---|---|---|
| **(४) राखीव निधी** – ठेवी (ग्रंथपारितोषिके व स्मृतिदिन) | | | | |
| गिरिजा-गंगाधर जांभेकर पारि. | १,०८०-०० | | | |
| विश्वनाथ पार्वती गोखले पारि. | ५,९३६-०० | | | |
| ह. ना. आपटे पारितोषिक | १,०००-०० | | | |
| अंतुकाका भिडे पारितोषिक | ५००-०० | | | |
| गोखले बंधू दोन पारितोषिके | २,०००-०० | | | |
| शि. म. परांजपे पारितोषिके | ३,५००-०० | | | |
| सांगली शाखासभा (परीक्षा पारि.) | ४००-०० | | | |
| वि. कां. ओक स्मृत्यर्थ | १,०००-०० | | | |
| नाथमाधव स्मृत्यर्थ | १,५००-०० | | | |
| ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ | ४,०००-०० | | | |
| तुळशीराम वात्र पारितोषिक | ५,०००-०० | | | |
| श्री. म. माटे व्याख्यानमाला | ५,०००-०० | | | |
| ज्ञानकोशकार केतकर स्मृत्यर्थ | १,५००-०० | | | |
| पिलाजीराव फडणीस स्मृत्यर्थ | ३,०००-०० | ३५,४१६-०० | | |
| श्री. गणेश-सरस्वती ठाकूर देसाई यांचे नावे | १२,०००-०० | | | |
| कै. सुनील प्रधान पारितोषिक | ३,०००-०० | | | ५३,९१६-०० |
| कै. वि. द. घाटे स्मृत्यर्थ | ३,५००-०० | | ५३,९१६-०० | २,२०,६७५-१८ |
| | | १,८४,४६२-७२ | (वाढ | ३६,२१२-३८) |

महाराष्ट्र साहित्य

अर्थसंकल्प :

| खाते | संकल्प १९८१-८२ रुपये | प्रत्यक्ष १९८१-८२ रु. पै. | सकल्प १९८२-८३ रुपये |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | २०,००० | + २१,७७१.०२ | २२,००० |
| देणग्या | १८,००० | + २२,४६६.०० | २०,००० |
| शासकीय अनुदान ( मेंटेनन्स ) | ५,००० | + १५,०००.०० | ५,००० |
| महानगरपालिका अनुदान | १,००० | − ५००.०० | ५०० |
| ग्रंथालय अनुदान | २,००० | − १४६३ ०० | २,५०० |
| सा. सं. मंडळ अनुदान ( पत्रिका ) | ८,००० | १०,०००.०० | ८,००० |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | ३,००० | ३,०५७.४० | ५,००० |
| साधारण सभासद वर्गणी | १२,००० | + १३,०४७.०० | १२,००० |
| संलग्न संस्था वर्गणी | २०० | १७०.०० | २०० |
| किरकोळ | ४०० | ३२२.३२ | ३०० |
| प्रकाशने ( विक्री ) | ५०० | + १४७५.३२ | १,००० |
| संशोधन ( प्रकाशन ) | ३,००० | + १५,३२८.७० | ३,००० |
| ग्रंथव्यवहार परिषद/संमेलन | २,००० | १,०३१.१२ | — |
| तूट | ३८,९०० | १५३२९·११ | २६,१०० |
| | १,१४,००० | | १,०५,१०० |

ग. वा. वेहेरे
कार्याध्यक्ष

म. श्री. दीक्षित
कार्यवाह

अनुक्रमणिका






परिषद. पुणे ४११०३०
१९८२-८३

| खाते | संकल्प १९८१-८२ रुपये | प्रत्यक्ष १९८१-८२ रु. पै. | संकल्प १९८२-८३ रुपये |
|---|---|---|---|
| कर व भुईभाडे | १,०७० | - ९६०.०० | १,००० |
| इमारत दुरुस्ती, रंग, विमा | २,००० | - ३८७.१० | १.००० |
| फर्निचर व इतर दुरुस्ती | ३,००० | - १,८२०.१५ | ३,००० |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड | १५,००० | + १५,२८४ २२ | १७,००० |
| छपाई, टायपिंग, स्टेशनरी | २,५०० | - २,०६१.६२ | २,००० |
| टपाल व दूरध्वनी | ३,००० | + ३,६०७.९० | ५,००० |
| वीज | २,५०० | + ४,००४.५४ | ४,५०० |
| कार्यकारी मंडळ सभा | ५,००० | + ५,१७७.१० | ५,००० |
| प्रवास व प्रचारकार्य | २,००० | + २८२७.९० | २,५०० |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ५,०५० | - ४,८९७.९० | ६,००० |
| पत्रिका ( छपाई, कागद, टपाल, इ. ) | २५,००० | + ३५,९००.८० | २५,००० |
| ग्रंथालय ( व्यवस्थापन + खरेदी ) | ५,००० | + ५,०२३.३५ | ६,००० |
| शाखासभा, ( वर्गणी हिस्सा ) | २,००० | + ३,८२८.०० | ५.००० |
| महामंडळ सभा व वर्गणी | १,५०० | - १,४४१.५५ | १,५०० |
| आतिथ्य | १,००० | - ९५४.२० | १,५०० |
| ग्रंथपारितोषिके व स्मृतिदिन | २,००० | + ३,२१८.७० | ३,५०० |
| हिशेब तपासनीस | ४०० | - ३५०.०० | ५०० |
| किरकोळ | १,००० | - ८४७.२७ | १,००० |
| संशोधन व प्रकाशन | १६,००० | + २४,७३०.४० | १,००० |
| प्रकाशने ( इतर ) | १,००० | - ४९.६० | ५०० |
| ग्रंथव्यवहार परिषद/संमेलन | २,००० | - १,०३१.१२ | ३,००० |
| घसारा | ८,००० | - ६,१७६.८१ | ८,००० |
| त्रैवार्षिक निवडणुका | ५,००० | + ६,६५९ ०५ | २,००० |
| विश्वस्त व्यवहार | १०० | - ३८.०० | १०० |
| | १,१४,७०० | | १,०५,१०० |

**राजेंद्र बनहट्टी,**
कार्यवाह

**वसंत स. जोशी**
कार्यवाह

**राजा फडणीस**
कोषाध्यक्ष

अनुक्रमणिका





आवर्त
ठेव योजना
निश्चित काळ
ठेव योजना
संचित
ठेव योजना
चिंटी मिंटी
मी खारोटी
गोष्ट सांगते मोलाची
सवय करा हो
बचतीची !
कॅश सर्टिफिकेटस्
आणि भेट चेक
सदाफुली
ठेव योजना
तुमची हितचिंतक मिंटी
महाबँकेची
बँक ऑफ महाराष्ट्र
(भारत सरकारचा उपक्रम)
मुख्य कचेरी : 'लोकमंगल', शिवाजी नगर, पुणे ४११ ००५